# मासलेवाईक चेहरे !



लेखक

मोरेश्वर गोविंद सोमण, B. A.




पुणें, सन १९३९ इसवी.

प्रकाशकः—
जनार्दन सदाशिव लिमिटेड,
३९४ सदाशिव पेठ, पुणें नं. २.

## मिळण्याचीं मुख्य ठिकाणें.

जनार्दन सदाशिव लि.
३९४ सदाशिव, पुणें नं. २

मुंबईस फक्त बुकसेलर्सकरितां
रा. रा. सदाशिव हरी मोडक,
बी. ए. ऑनर्स,
काळाराम मंदिर, ठाकुरद्वार
मुंबई नं. २

मुद्रकः—
लक्ष्मण सखाराम केळकर,
जनार्दन सदाशिव लि. चा प्रेस,
३९४ सदाशिव पेठ, पुणें नं. २.

# साहित्याचार्य



न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर.



माझे

आदर्श ग्रंथकार

गुरुवर्य

# नरसिंह चिंतामण केळकर

यांस अर्पण.

# चेहरे पहाण्यापूर्वीं.



प्रिय वाचक ! या पुस्तकांतील चेहरे मी न सांगितले तरी तुम्ही आतां आनंदानें पहालच. पण थोडे थांबा. त्यांची ओळख करून देतो. अरे पण खरंच कीं मी अगदींच विसरलो ! त्यांची तुमची पूर्वींचीच ओळख आहे. बघा आठवत कां ? काय नाहीं आठवत ? अहो यांतील कांहीं चेहरे केसरी, सह्याद्रि, यशवंत, चित्रा, कौमुदी इत्यादि साप्ताहिकांतून आणि मासिकांतून तुम्हीं पूर्वीं पाहिलेच आहेत. त्यावेळीं तुमच्यापैकींच कांहींनी आनंदाच्या भरांत मला पत्रें पाठविलीं तर कांहींनी भररस्त्यांत माझी पाठ थोपटली. म्हणूनच या चेहऱ्यांचे संमेलन भरविण्याचे मी ठरविलें. यांतील कांहीं चेहरे पाहिल्यावर ते आपले आहेत असें कोणास वाटेल. तर कोणी ते आपल्या मित्रमैत्रिणींचे आहेत असें चटकन् सांगतील !

असो. सुंदर चेहऱ्यांचे स्वागत करण्यास कोणास सांगावे लागत नाहीं. पण या चेहऱ्यांचे ते देखणे नाहींत म्हणून नाके न मुरडतां तुम्ही हसन्मुखानें स्वागत कराल अशी मला आशा आहे. जनार्दन सदाशिव लि. प्रेसच्या मालकांनी हें संमेलन भरविण्याचे काम अंगावर घेतलें. आणि ते मोठ्या उत्साहानें पार पाडलें याबद्दल मी त्यांचे आभार मानतो.

पुणें,
ता. १।७।३९

मोरेश्वर गोविंद सोमण.

---

# अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.

# मासलेवाईक चेहरे !

प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत असे हरघडी प्रसंग येतात कीं त्या वेळीं आपले चेहेरे फोटो काढण्यासारखे असतात. त्या प्रसंगीं आपलें आपणासच हसूं येतें, आपले आपणच खजील होतों; आपणाला तोंडांत मारल्यासारखें होतें, आपण अगदीं शरमून जातों. त्या प्रसंगीं आपण वेडयासारखे कसें बोललों, मुक्ताफळें कशीं उधळलीं, अज्ञानाचें प्रदर्शन कसें केलें, साधेपणाच्या वागणुकीवर बोळा कसा फिरविला, माणुसकीला कसे मुकलों, हास्यास्पद कसे ठरलों, सर्वांच्या चर्चेचा विषय होऊन कसे बसलों व सोळा आणे फजिती कशी उडाली, हें सर्व निमिषार्धांत डोळ्यांपुढें उभें रहातें. त्या निरनिराळ्या प्रसंगीं आपल्या मनामध्यें निरनिराळे विकार उत्पन्न होतात आणि ते मुखावर उमटतात. त्या वेळीं आपले चेहरे स्नॅप घेण्यासारखे असतात. मग अर्थातच ते पाहण्यासारखे असतील यांत काय नवल ! अशा मासलेवाईक चेहऱ्यांचे कांही नमुने खालीं दाखवीत आहें.

१

लहानपणापासून मला नाटकाचा अतिशय शोक. कोणतीहि कंपनी पुण्याला येवो; मी माझ्या मित्रमंडळींसह तिच्या पहिल्या खेळाला हजर ! अगदी पहिल्यांदा मी नाटकांतील प्रत्येक पदाला ' वन्स मोअर ' देत असें. नटाने तें न ऐकतां भाषणास सुरुवात केली तर ओरडण्यास सुरुवात करीत असें. या वेळीं नाटकाचे मॅनेजरसाहेब मला बाहेर घालवीत. त्या वेळीं माझा चेहरा पाहण्यासारखा होई. माझी थोडी कानउघाडणी करून प्रवेश संपल्या-वर मला आंत बसण्याची परवानगी देत. आंत बसल्यावर मित्रांनी व आसपासच्या लोकांनी चौकशी केल्यावर ' मॅनेजरने मला आग्रहाने चहा घ्यायला बोलाविलें होतें ' असें मी म्हटल्यावर सर्वजण खो खो हसत. नाटक चालू असतां नटांचें तें नटणें मुरडणें, त्यांचे ते उंची पोषाख, हिऱ्या-मोत्यांचे दागिने, ते स्टेजवर आल्यावर लोकांनी नांव घेऊन त्यांच्याकडे

बोट दाखविणें व लोकांनी त्यांच्या पदाला व भाषणाला टाळ्या देणें पाहिलें कीं आपणहि नाटक कंपनींत जावें असें मला लहानपणापासून वाटे. या नटांना आठवड्यांतून फक्त तीन दिवस काम, आणि तें सुद्धां ४।५ तासांत यांचें काम येईल तेव्हां. बाकी चोवीस तास मोकळे. पगारहि भरपूर. शिवाय नाटक पाहायला म्हणून दिडकी खर्चायला नको ! खरोखर या नटांसारखा कोणी भाग्यवान् नाही असें मला वाटे. यांची व आपली ओळख झाली तर काय बहार होईल असें नेहमी वाटावयाचें. पण सुदैवाने तो योग लवकरच जुळून आला. कारण आमच्या गांवचा कुशा भिडे, नाटक कंपनींत गेल्याचें वृत्त मला माझ्या वडिलांकडून आलेल्या पत्रावरून कळलें. 'पुण्यास मी तुला पैसे कसे पाठवीत आहें हें माझें मला माहित. अभ्यास मन लावून करावा. नाटकें पाहून उनाडक्या केल्यास तर शेवटीं कुशाप्रमाणें नाटकांत जायची पाळी येईल ! सध्या तो माध्यान्ह संगीत नाटक मंडळींत गेला आहे असें ऐकतों. येथून घरांतून पांच रुपये चोरून पळाला आहे, पोरगा फुकट गेला; आईबापांच्या तोंडाला काळोखी फासलीन. तपास करीत आहों.' पण हें पत्र वाचून मी गंभीर होण्याऐवजीं मला अत्यानंद झाला. कारण माध्यान्ह मंडळीचा मुक्काम सध्या पुण्यासच होता ! मधल्या सुट्टीनंतर शाळेला चाट देऊन मी किर्लोस्कर थेटरमध्ये गेलों व कुशाची चौकशी केली. कुशा दिसल्यावर तो व मी अगदी कडकडून भेटलों. तो म्हणाला 'अरे येथे नुसती चंगळ आहे. रोज दुपारीं तालमी पाहायला मिळतात. नाटक पाहायला फुकट मिळतें. अरे मला फक्त दासीचें काम, दोन तीन वाक्यें सारीं बोलावयाचीं. मी स्टेजवर आल्यावर कांही लोक खाकरतात. म्हणून आमचे मालक मला शाबासकी देतात. ते म्हणतात तूं फार मारू दिसतोस. म्हणजे काय रे ? अरे, शिवाय जेऊन खाऊन रुपया पगार ! काय वाईट आहे ? आपल्या गांवांत महिन्या महिन्यांत दिडकी नजरेस पडत नाही. कधी ब्राह्मण बोलावले तर दक्षिणा मिळायची !" कुशा आंवढा न गिळतां सारखा बोलत होता.

मी म्हणालों, 'अरे, छान; मी सुद्धा येईन म्हणतों. तुझे मालक मला घेतील का ? चल जाऊं आपण त्यांना विचारायला.'

आम्ही गेलों तों मालक आणि चारपांच मंडळी एका ज्योतिष्याला हात दाखवीत असतांना दिसली. आम्ही आंत शिरतों तोंच आमच्या मागे माझे आणि कुशाचे वडील दत्त म्हणून उभे ! पण तेथली मंडळी बोलण्याच्या ऐनरंगांत असल्यामुळे आम्हांला ओळख न देतां ते खोलीबाहेर आले व विडया ओढीत एकीकडे कानोसा घेत बसले.

मालकांची किशाकडे नजर वळल्यावर ते एकदम ज्योतिष्यास म्हणतात; 'या मुलाचा पाहा हो हात. हें मोठं गोड पोरगं आमच्या कंपनीला लाभलं आहे. रंगल्यावर दिसतंहि फक्कड. कोणी सांगावं हें पोरगं मोठं झाल्यावर कदाचित् कंपनी नांवारूपाला आणील.' हें ऐकून बाहेर आम्हा दोघांचे वडील तोंडाने 'शिव, शिव' म्हणत होते. ज्योतिषाने हात पाहून 'हें पोरगें भाऊराव कोल्हटकर किंवा बालगंधर्व यांच्याप्रमाणें पुढे नांव काढील' अशी तोंडभर स्तुति केली. मलाहि नाटकांत जावयाचें होतें म्हणून मीहि आपला हात ज्योतिषापुढें भीतभीत केला. मालक म्हणाले, 'किशा, हा कोण रे ?' किशा म्हणाला 'याला आपल्या कंपनींत यायचं आहे. हा माझ्या गांवचा आहे.' 'वा ! फार छान ! मग याचाहि हात जरूर पाहा ज्योतिषीबोवा,' मालक म्हणाले. (या वेळीं आमच्या वडिलांचा चेहरा कसा झाला असेल याची कल्पना करा !) माझा हात बराच वेळ पाहून ज्योतिषीबोवा बोलले, 'सध्या जरी याला दुय्यम स्त्रीपार्ट घ्यावा लागत असला तरी वयाच्या सव्विसाव्या वर्षी मुख्य स्त्रीपार्टयाचें काम याला मिळेल. याचा शुक्र फार बलवान आहे आणि त्या वर्षी शुक्राचा उदय होतो.

'काय रे, हल्ली कोणत्या कंपनींत असतोस ?' मालकांनी विचारलें.

'सध्या मी इंग्रजी पांचवींत आहें. नाटक कंपनींत नाही' मी म्हटलें.

'खूप केलीत ज्योतिषीबोवा !' मालक हसत हसत व मित्र मंडळींना टाळ्या देत म्हणाले.

'आता कसले यांना पैसे द्यायचे?' एक गृहस्थ उद्गारले. या वेळीं ज्योतिषी इतका खजील झाला की सांगायची सोय नाही. आता बाहेर बसण्याची परमावधि झाल्यामुळे आमचे वडील एकदम आंत आले. त्यांना पाहिल्यावर आम्ही थंडेच पडलों!

## २

मी पुण्यास कॉलेजमध्ये शिकत असतांना अशीच एकदा मजा उडाली. माझ्या एका मित्राचे वडील आपल्या मुलाच्या काटकसरी, निर्व्यसनी व धार्मिक रहाणीबद्दल नेहमी स्तुती करीत. व मी थोडासा उनाड व टवाळखोर असल्यामुळे माझ्याशीं फारसा संबंध न ठेवण्याबद्दल त्यास पत्रांतून बजावीत. कारण आमचे मित्र बन्याबापू व मी वसतिगृहांत शेजारीशेजारींच राहात होतों. जानेवारी महिन्याचे दिवस. दुपारीं पांच साडेपांचचा सुमार. यावेळीं आमच्या बन्याबापूंच्या खोलींत पांच सहा मुलांचे सिगारेट ओढण्याखेरीज अगदी निरनिराळे कार्यक्रम चालले होते. सर्वांच्या सिगारेटच्या धुराचे तरंग खोलीभर धुक्याप्रमाणें पसरत होते. खुद्द बन्याबापू हे दाढी करतांना एकीकडे डाव्या हातांतील सिगारेटचा झुरका घेत होते. एकजण स्टोवर चहा करीत होता. दुसरा चाकूने कांदे चिरीत होता. तिसरा 'पांढरे बटाटे' सोलीत होता. बाकीचे डाळीच्या पिठाची पुडी सोडण्यांत व कोथिंबिरीचे टापू मोडण्यांत गुंतले होते. यावरून या मंडळींना कोणता पदार्थ तयार करावयाचा होता हें कॉलेजांतील मुलांना कळेलच! कॉलेजांतील मुलींचे विषय तोंडी लावायला असल्यामुळे हास्यविनोदाची लयलूट चालली होती. इतक्यांत दारावर कोणी थाप मारल्याचा आवाज झाला. 'Name Please' म्हणून बन्याबापू ओरडले. पण उत्तर न मिळतां फिरून दारावर जोराची थाप पडली. पण बन्याने फिरून 'Name Please' म्हटल्यावर "पुष्कळ इंग्लिश बोललास, दार उघड!" असा ओळखीचा आवाज ऐकू आला. या वेळीं बन्या दाढीवर दुसरा हात फिरवीत असल्यामुळे

मित्रानेच दार उघडलें. तों समोर बन्याचे वडील ! बन्याने शरमून खाली मान घातली. मित्रमंडळींनी पोबारा केला. खोलींतील तें दृश्य पाहून बापलेकांचे चेहरे स्नॅप घेण्यासारखे झाले नसतील काय ?

३

आमच्या गांवांतील गोविंदराव वर्तकांचें खानदानी घराणें म्हणून लौकिक होता. पण गोविंदरावांचें आणि त्यांच्या वडील मुलाचें कधी पटत नसे. बापलेकांचा उभा दावा. त्यामुळे त्यांचे नेहमी खटके उडावयाचे. खेड्यांतील तीं भांडणें ! तिथे बोलण्याची काय सबूर आहे ? बापाने म्हणावें 'तूं मला मेल्यासारखा आहेस.' उलट मुलाने म्हणावें 'तुम्ही जिवंत असून नसून मला सारखेच आहां.' बापाने रागाच्या भरांत 'तूं माझा कार्टा नाहीस' असें म्हणावें. यावर मुलाने 'असं असेल तर फार चांगलं' असें बरळावें. या वेळीं रस्त्याच्या कुसवाआड भांडण ऐकण्यासाठीं लपून बसलेलीं पोरें टाळ्या वाजवून हसूं लागलीं म्हणजे बापलेकहि खजील होत ! बापलेकांच्या भांडणाचे असे सामने नेहमी होत. पण दुर्दैवाने मुलाचें लवकरच देहावसान झालें. त्यानंतर एके दिवशीं गोविंदरावांचे जांवई शिष्टाचाराप्रमाणें दुखवट्याचे भेटावयाला आले. पण गोविंदराव ओटीवर नसून स्वयंपाकघरांत होते म्हणून नमस्कार करावयास तेथे गेले. तों गोविंदरावांची स्वारी लाडू खातांना त्यांना दिसली ! त्यांना पाहून गोविंदरावांचा चेहरा खर्कन् उतरला !

४

लग्नापूर्वी लग्नाच्या गोष्टींत कोणता तरुण रंगून जात नाही ? आपल्या मित्राच्या भावी पत्नीच्या रूपगुणांचें वर्णन ऐकून कुणाला मनांतल्या मनांत हसूं येत नाही ? कुणाला शेखमहंमदाची आठवण होत नाही ? मग याला मी व माझे मित्र लखोबाच कसे अपवाद ठरणार ?

अशाच एके दिवशीं लग्नाच्या गोष्टी निघाल्या असतांना लखोबा मला म्हणाला, 'सोमण तूं कांही म्हण, आपण लग्न करणार तर विमलशींच करणार. तिनं मला वेड लावलन आहे.'

'अरे वा ! उडी तर मोठी आहे !' मी म्हणालों.

'तिचे हाव भाव कुणाला भुरळ पाडणार नाहींत ?'

'वा ! वा !'

'तिच्या शेपट्याची मोहक हालचाल कुणाचें हृदय काबीज करणार नाही ?'

'अरे पण तिचा शेपटा कल्चर्ड आहे का बसराइत आहे ?'

'कल्चर्ड म्हणजे गंगावन घातलेला म्हणतोस ना ?

'केंव्हाहि.'

'मग तिचा शेपटा बसराइत आहे, अगदी Natural आहे Natural. आहेच तशी ती गोड. तिच्यासारखी पोर सापडून सापडायची नाही !'

'तुझ्या हातीं, अगदी खरं !'

'पुरेरे तुझे शब्दश्लेष ! शब्दांचा चोळामोळा करण्यांत तुझा अगदी हातखंडा आहे.'

'आणि आशेचा चोळामोळा करण्यांत तुझा कोणी हात धरणार नाही. वेड्या तिची engagement आधींच ठरलेली आहे !'

'आँ, काय म्हणतोस ?'

'हो हो, अगदी खरं, तूं आपला दुसरा नाद धर.'

'बरं बोवाँ, विमल नाही तर नाही, पण विमलइतक्या सुंदर मुलीशींच मी लग्न करणार.'

'ध्येय ठीक आहे.'

या संवादानंतर चार वर्षांनीं अचानकपणें कर्जत स्टेशनवर माझ्या मित्राची व माझी आगगाडींत गांठ पडली. त्याच्या शेजारीं दोन जवळ जवळ सारख्या वयाच्या तरुणी होत्या. एक अगदी हुबेहूब त्याच्या विमलसारखी सुंदर होती आणि दुसरी होती, तिने गडकऱ्यांच्या ठकीचे पुष्कळसे गुण उचलले होते. मी त्याच्या शेजारच्याच बांकावर बसलों. माझ्या भिडस्त

स्वभावामुळें मी त्या दोन मुलींची त्याजकडून ओळख करून घेतली नाही. लखोबा त्या सुंदर मुलीशीं सारखा बोलत हसत होता व दुसरी मुलगी बाहेरील निसर्गाचा देखावा पाहत होती ! लखोबाला नशिबवान समजून मी मनांतल्या मनांत त्याची कुंडली आठवूं लागलों.

इतक्यांत लोणावळें आलें म्हणून चहा प्यायला आम्ही खालीं उतरलों. मी त्याच्या पाठीवर थाप मारून ' तें गुलाबाचं फूल आपलं वाटतं. लेका, लकी आहेस ! ' असें म्हणालों. तोंच–तोंच अगदी आंबट चेहरा करून तो म्हणाला ' ती नाही रे, ती पलीकडली ! अगदी भूत आहे, भूत ! मला द्विभार्यायोग आहे का बघ ! '

५

खेडयांतील भाऊबंदांच्या वांटण्या आणि तेथे भांडण नाही असें कधीं झालें आहे ? या वेळीं गांवांतील लोकांना करमणुकीला याशिवाय दुसरा विषय नाही. अगदी क्षुल्लक वस्तूसाठी ते हातघाईवर येतात !. आता हेंच पाहाना; पंचवीस फुलवाती त्या काय आणि त्यांची दोघांमध्ये वांटणी ती काय ! पण नाही. एकाला बारा व एकाला तेरा फुलवाती–एक जास्त काय म्हणून ? शेवटी एका भावाने एक फुलवात जास्ती होती ती मोडून तिची म्हातारी करून वाऱ्यावर उडवली ! अशी जिथे गोष्ट, तेथे खालील हकीकत घडल्याबद्दल कोणाला संशय येईल ?

आण्णा व नाना हे दोघे सख्खे भाऊ. याचे वडील वारल्याला चांगलीं दहाबारा वर्षे लोटलीं होतीं. वृद्ध मातोश्री असेपर्यंत वेगळें व्हावयाचें नाहीं असे दोघांनी ठरविलें होतें. पण आई नुकतीच निवर्तल्यामुळें भावाभावांच्या वांटण्या झाल्या. जमीन–जुमला, घरदार, सोनेंनाणे, भांडींकुंडीं वांटून झाल्यावर कापडचोपड वांटण्यास सुरुवात झाली. पैठण्या पितांबर ज्याचें त्याने घेतलें. लोकांकडून अहेर आलेले फेटे, लुगडीं वांटून झालीं. शेवटीं आईच्या गाठोडयांतील सोवळें चार वाण होते त्यांचें काय करायचें असा

प्रश्न आला. मोठा भाऊ व गांवांतील चार म्हातारी शिष्ट मंडळी म्हणाली, ' आपल्या गांवांतील गं. सुभद्राबाई, रमाबाई गरीब आहेत, त्यांना तीं द्यावीं. नांव तरी काढतील. ' यावर धाकटा भाऊ म्हणाला ' तर तर, म्हणे त्यांना लुगडीं देऊं फुकाचींच आलीं वाटतं. तें कांही नाही, मला दोन लुगडीं पाहिजेत. माझ्या बायकोला नाही का उपयोगी पडणार ?' हें ऐकल्यावर तेथें जमलेल्या मंडळींची हसतां हसतां मुरकुंडी वळली.

६

वासुदेव भट हे प्रेताला अग्निसंस्कार देणारे भिक्षुक. स्मशानाजवळ चार पाऊलांवरच त्यांचें घर. त्यांच्याकडे रोज पांच दहा मंडळी नित्य येत. ती कशाची वर्दी द्यावयाला येत हें सांगावयास नकोच. तेव्हा यांच्याकडे येणारा प्रत्येक मनुष्य हा याच कामाकरतां येणार असा जणुं संकेतच ठरलेला होता. या वासुदेवभटाकडे मी एकदां लग्नाची अक्षत द्याव-गेलों होतों. मी टांग्यांतून त्यांच्या घराशीं उतरलों. तों वासुदेवभट त्यांच्या नेहमीच्या बसावयाच्या खोलींत नसून स्वयंपाकघरांत होते. म्हणून मी त्यांना हाक मारली. तों बाहेर न येतां ' तुम्हीं पुढें व्हा मी आलोंच पांच मिनिटांत ' असें उत्तर आलें. मला याचा अर्थ कळेना. एकदा वाटलें कीं, स्वारीला नारळ बुडवायचा असेल.

मी फिरून त्यांना बाहेर या म्हटल्यावर ' आज एकादशी आहे,उशीर होईल म्हणून चार दाणे टाकतों आहे तोंडांत. तुम्ही रचायला लागा तों मी आलोंच. खोटी बिलकूल करीत नाही, ' असा फिरून जबाब आला. मी आश्चर्यचकित झालों. या मंगल प्रसंगीं वरील शब्द ऐकल्यावर माझ्या मनांत कोणत्या कल्पना आल्या असतील ? ' अहो, जरा बाहेर तर या, माझें दुसरें काम आहे ' असें जरा रागाने म्हटल्यावर स्वारी बाहेर आली. आमची दृष्टादृष्ट झाल्यावर त्याला मेल्याहून मेलं झालें !

---

# रस्त्यावरील रहदारी.

पोहण्याची हौस मला लहानपणापासून. पुण्याहून गांवीं आलों कीं सकाळ संध्याकाळ माझी पावलें नदीकडे वळत. इतका मला तिचा लळा! आमची पाताळगंगा बोरघाटांत उगम पावून वळणें घेत घेत व आपल्या प्रवाहाचें पात्र विस्तीर्ण करीत आपट्यावर अरबी समुद्राला मिळते. आमची स्नेहगंगा अन्त:करणांत उगम पावून, मित्रांच्या घरून वळणें घेत घेत व आपल्या प्रवाहाचें पात्र विस्तीर्ण करीत मित्रसमाजांत, प्रीति–सागराला मिळते! त्यावेळीं नदीचें तोंड खारट होतें, पण आमचें गोड रहातें! जल-देवतेच्या अंगाखांद्यावर आम्ही आनंदानें खेळत असूं. अशा वेळीं मास्तर कृष्णा व बालगंधर्व यांचीं सर्व पेटंट पदें आमच्याबरोबर स्नानाला येत! कारण तीं म्हणतांना आम्ही पुष्कळ वेळां चूळ भरीत असूं! जल-क्रीडेचें वर्णन येथें कसें करूं? कारण लेखावरच पाणी पडावयाचें! स्नान केल्यावर हंसत्या किरणांची ओंजळ करून सूर्यनारायणाला मी अर्घ्य देई व मीं भक्तिभावानें अर्पिलेलीं अर्घ्यसुमनें भगवान् सहस्त्ररश्मी जलदेवतेच्या डोक्यांत घाली. त्यावेळीं वायुलहरी तिच्या लाटांचा पदर विनयानें हालवी व प्रेमकिरणांत तीहि हंसे. पुण्यास येतांना या लीलांना मला आचवावें लागे म्हणून फार वाईट वाटे; त्यामुळें येथें आलों तरी एखाद्या नूतन सासुरवासिनीप्रमाणें दोनचार दिवस मन तेथेंच जाई. येथें आल्यावर माझ्या समाचारास एक जोडपें वारंवार येई. त्यांचीं नांवें (घेऊ कां मी!) तीर्थस्वरूप खोकलेकाका व सौभाग्यवती थंडीकाकू हीं होत.! काकांना आवडे कॉफी तर काकूंना आवडे चहा. म्हणून येथें आल्यावर मला चहा कॉफीचें लग्न लावावें लागे! कारण मी पडलों चहाभक्त! काकांना कॉफीच कां आवडे व काकूंना चहाच कां आवडे, याचें पहिल्यानें मला कोडें पडे. पण हें गुलाबी कोडें सुटायला कठीण नाहीं. भिन्नरूचीचे स्त्रीपुरुष एके-

ठिकाणीं आले कीं असें व्हावयाचेंच. चहाची व कॉफीची जशी चव निराळी, तशी सुशिक्षित स्त्रीचीहि सुशिक्षित पुरुषाहून रुचि निराळी. मी काकूंना नेहमीं म्हणे कीं, 'काकू, उगीच 'कां कू' कां करतां ! तुम्ही काफीच घ्याना ! म्हणजे मला त्रास नको, वेळ जायला नको, दोन भांडीं घासायचा गड्याला त्रास नको व गाळण्यानेंसुद्धां आपला मनोधर्म सोडायला नको !' पण काकू माझे ऐकतील तर शपथ ! त्यांनीं आपल्या कानाला गाळणेंच लावून ठेविलें होतें ! त्यांतून मतलब मात्र गळे ! स्त्रियांचे इट्ट गोड असतात ते असे !

तेरड्याचा रंग तीन दिवस ! पाहुणा तीन दिवसांवर राहिला, कीं त्याच्या पाहुणचाराचे तीनतेरा झालेच म्हणून समजा. पण माझा स्वभाव भिडस्थ व प्रेमळ. मीं काका-काकूंना म्हटलें, कीं पुण्यास आल्यासारखें नाटक तर पाहून जा. माझा शब्द राखण्यासाठीं त्या ' हो ' म्हणाल्या. म्हणून ' रस्त्यावरील रहदारीचा खेळ' पाहाण्यासाठीं मीं गॅलरीच तिकीट काढलें व खुर्चीवर बसलों. काका–काकूंना मी दुसऱ्या व तिसऱ्या रांगेंतील खुर्च्यांचीं तिकीटें काढून देत होतो. पण काकूंना ती जागा आवडली नाहीं. त्या म्हणाल्या ' नाटक चालू असतांना कांहीं कॉलेजचे विद्यार्थी व त्यांच्या धर्तीचें इतर लोक मध्येंच उठून खेटून जातात. त्यामुळें आम्हांस बुचकळ्यांत पडल्यासारखें होतें. बाई ! ' लोकांचा वरचष्मा होऊं नये म्हणून संस्थानिकाप्रमाणें त्या वर चष्म्यांत बसल्या होत्या.

कांहीं रस्ते एखाद्या पेहेलवानाप्रमाणें गलेलठ्ठ असतात, तर कांहींच्य छातीचीं हाडें शरपंजरीं पडलेल्या माणसाप्रमाणें दिसतात. यांच्या शरिराची रचनाहि माणसाप्रमाणें पाहून फार कौतुक वाटतें. मनुष्याप्रमाणें यांच्या शरिरांतहि लांबलाब धमन्या आहेत, मलाशयहि आहे व मनुष्याप्रमाणें यांच्या हृदयांत प्रीतीचे पवित्र निर्झरसुद्धां वहात आहेत. या रस्त्याच्या जूला स्वागत करण्यासाठीं कांही युरोपियन लोक वावे वावेच्या अंतरानें

पांढऱ्या टोप्या घालून उभे आहेत. आम्ही हिंदूपेक्षां कीर्तीनें व वैभवानें उच्च आहों; हें दर्शविण्याकरतां ते उंच जागीं उभे आहेत. पण कांहीं झालें तरी रस्ताच मोठा; कारण त्याच्या स्वागतासाठीं ते उभे आहेत ! म्हणजे पर्यायानें हिंदूच श्रेष्ठ, नव्हे का ? हे युरोपियन लोक दिवसा किंचित् फिकुटलेले दिसतात, पण रात्र झाली कीं यांच्या गालावर लाली चमकूं लागते. मला वाटतें सायंकाळीं हे तोंडाला रंग लावीत असतील ! अथवा मदिरा यांच्या मंदिरीं येत असेल, कोणी सांगावें ?

जलदेवतेनें अवनितलावर नुकताच सडा शिंपला होता; व अद्याप रांगोळी कोणी कसें घांलीत नाही याबद्दल ती आश्चर्य करीत होती ! एवढ्या मोठ्या रस्त्यावर रांगोळी कोण घालणार; व घालावयास गेले तर जनता व रूढी हंसणार ! इतक्यांत मिसेस मोटार आश्चर्यचकित होऊन तेथून जाऊं लागली आणि तिची पाऊलवाटच रांगोळीच्या आकृतीसारखी वाटूं लागली.

थोर विभूतींच्या पदकमलांवर कांहीं दैवी चिन्हें असतात; तें कांहीं खोटें नाही.

रहदारीचा रस्ता आणि वर्तमानपत्र जणूं काय सख्खीं भावंडेंच होत ! वर्तमानपत्राच्या जाहिरातींत किंवा वर्तमानसारांत कधीं एकसूत्रीपणा असतो का ? तीच स्थिति रहदारीच्या रस्त्यांत दृष्टीस पडते. एके ठिकाणीं 'निर्भेळ दूध' म्हणजे पाण्याशिवाय कोणचीहि भेळ नसलेलें दूध मिळेल म्हणून 'पांढऱ्या' अक्षरांत लिहिलेली पाटी, तर लगेच शेजारीं जळाऊ लांकडाची वखार ! त्याच्या पलीकडे फूलवाला माळी, तर त्याला लागून बांगडीवाल्याचें दुकान ! पक्षकाराचें पौष्टिक औषध कोठें मिळेल असें वकीलाची पाटी, शेजारच्या डॉक्टरच्या पाटीला विचारीत असते. हॉटेलें, सलून, शिंप्यांचीं व पान-पट्टयांचीं दुकानें कोठें घुसतील याचा तर ताळच राहिलेला नाहीं.

प्रस्तुत वर्तमानसारांतील मी फक्त सार सांगणार आहे, सारें सांगणार नाहीं. दोन गृहस्थ ऑफिसातून येत आहेत. एकाच्या हातांत मेथीची

जुडी आहे; जणुं कांहीं एखाद्या गुच्छाप्रमाणें ते तिला कुरवाळत आहेत' मला वाटलें, 'भाजींत भाजी मेथीची, ×× माझ्या प्रीतीची' वगैरे नांव घेतलेलें आठवून ते आपल्या प्रियेऐवजीं त्या जुडीलाच कुरवाळीत आहेत! दुसरे त्यांचे स्नेही 'आंबट चुका' घेऊन जात आहेत. ऑफिसमध्यें झालेल्या चुका आठवून ते आंबट तोंड करून जात आहेत ! नेमानें सिनेमास जाणारा आज खिशांत पैसे नाहींत म्हणून चुटपुटत असतो; व गोंडस थाप कशी मारावी अथवा वडिलांच्या खिशांतून पैसे कसे काढावे या विचारांत गर्क असतो. याचे नातलग शाळेंतील कांही विद्यार्थी होत !

कांही वेळानें शेजारच्या वाडयांतील एक बाई हातांत केर घेऊन तो म्युनिसिपालिटीच्या पेटींत टाकावयास आली. त्या वेळेला म्युनिसिपालिटीचे नोकर त्या पेटींतील केर मोटारींतून भरीत होते व आंतील केर जाणाऱ्या येणाऱ्या माणसाला घाणेरडी बातमी सांगत होता ! काय ही म्युनिसिपालिटीची आरोग्य–व्यवस्था ? घाण काढण्याची वेळसुद्धां किती सोईस्कर ! हर ! हर ! काय त्या पेटीचें व मोटारीचें दुर्दैव ! त्यांचे जातभाई आज दुसरीकडे किती श्रीमंत स्थितींत असतील हें त्यांना काय ठाऊक ? आणि यांच्या पोटांत पाहावी तर सर्वांच्या घरची घाण जावयाची ! पण त्यांना कशाला हंसावयास पाहिजे ? जणुं कांही त्यांचे प्रतिस्पर्धीच म्हणविणारे दुष्ट लोक तेथून जात होते. त्यांचें अन्तःकरणहि दुष्ट विचारांनीं गढूळ झालेलें होतें. घरांतील केर जसा केरसुणीनें काढतां येतो तसा यांच्या अन्तःकरणांतील पापी वासनांचा केर संतांच्या वचनकेरसुणीनें काढता येणार नाहीं का ?

कोणी एक मध्यम वयाचे गृहस्थ सायकलवरून जात होते. त्यांच्या समोरून मांजर आडवे गेलें म्हणून ते खालीं उतरले. मीं त्यांना म्हटलें, 'अहो सद्‌गृहस्थ ! आपण सायकलवरून खुशाल जा. कारण मांजर सायकलवरून जात नाहीं ! त्यामुळें आपणास त्याचा अपशकून नव्हे. पायीं जाणाऱ्याला

तरी मांजराचा कसला अपशकून!! निस्तेज झालेल्या रूढी म्हणजे नुसती मढीं! पण अज्ञ जनता त्यांना अजून पोटाशीं कवटाळिते ती अशी!

रस्त्यांतील कांहीं दरवाजे लग्न होण्यासाठीं आपल्या डोक्याला मुंडावळी बांधून बसले होते; कांहींनीं विघ्नहर्त्याला साक्षी ठेविलें होतें! पण त्यांना मुलगी कोण देतो! नूतन विवाहित दिंडी–दरवाजांचीं जोडपीं अजुनसुद्धां-डोक्याला मुंडावळी लावून रहदारीचा खेळ पाहात होतीं. लोकांचें लक्ष आधीं आपल्याकडे वेधावें म्हणून तर त्यांनी मुंडावळी ठेविल्या नसतील ना?

विद्यार्थी आतां आपल्या खोल्या सोडून बाहेर येऊ लागले, म्हणून हॉटेलांतलीं भजीं खदखदां हांसत होतीं! सिगारेटसारख्या गोऱ्याबाईला हायसें वाटत होतें, व दिलखुष सुपारीचा 'दिल' 'खूष' होता. विद्यार्थ्यां-सारखा त्यांचा उपकारकर्ता अन्य कोण आहे?

पण हें काय? हे गृहस्थ हळूहळू कां जात आहेत? पाऊस नुकताच पडून गेला होता म्हणून उघडलेली छत्री तशीच त्यांच्या डोक्यावर होती. त्यांच्या छत्रीवरील नांव पाहून कोणाहि विनोदी माणसाला हसूंच येईल. व हुच्चा तरुणांना तें नांव दिसलें तर थट्टेचा विषय होऊन सर्व रस्ता त्यांच्या भोंवताल्न फुलून जाईल! छत्रीवर नांव गोदूबाई छत्रे असें होतें, पण चालणारे गोविंदराव होते. कोणी म्हणतील, हे छत्रे घरधनिणीच्या हातांतील बाहुलें असतील! कोणी म्हणतील, छत् रे, तसें नसेल; हे बेकार पदवीधर असून यांची बायको मुलींच्या शाळेंत मास्तरीण असेल! सध्यां हे तिच्या छत्राखालीं असल्यामुळें अन्नछत्रे नसले तरी गृहिणीछत्रे खास आहेत! विवाहित मनुष्य सव्यसाची असला म्हणजे असा फायदा होतो. आतां तरि सुशिक्षित स्त्रियांच्या नावानें खडे फोडूं नका. पण गोविंदराव सुखी होते का? दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्यांत त्यांना आनंद का वाटत होता? त्यांचा चेहेरा गोगलगाईसारखा झाला होता. श्रावण महिन्यांत कोंकणांत गोगलगाई दिसू लागतात व आतां मुसळधार पाऊस पडणार असें लोक

अनुमान करतात. गोविंदरावांच्याहि चेहेऱ्यावरून त्यांच्या अन्तःकरणांत दडून बसलेले दुःखाचे कृष्णमेघ मनोविकारांचें दडपण पडून नयनावाटें बाहेर येतील असें वाटत होतें. ह्यांच्यासारखे परिस्थितीनें नाडलेले सुशिक्षित थोडे का पुण्यांत आहेत ? पण त्यांच्याकडे काय दोष ? हा दोष × ×!!

तो शुक्रवार होता. काबलीवाला " शुक्रवार—बालाजीका वार — घ्यारे काबली ऽ " असें ओरडत होता. जणूं आंतील काबली ' मला कां बली ?' म्हणून त्याच स्वरात ओरडत होती.

' आंधळयाला पैसा, दे रे बापा ' म्हणून भजन करीत आंधळ्याची मालिका रस्त्यांतून जात होती लहान मुलांप्रमाणें आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ ही मंडळी खेळत होतीं. पण त्यांच्यावरील हार कधींहि फिटणारी नव्हती ! पृथ्वीप्रदक्षिणा करणारा वाटोळा पैसा दिल्याबरोबर त्यांना आनंद झाला. गरिबांना आनंद झाला म्हणजे सर्वांना आनंद होतो, हें सांगण्या करतांच मेघांचें पटल दूर सारून दिनकर आपल्या करांनीं वसुंधरेला कुरवाळीत होता ! त्या सायंकाळच्या कोंवळ्या किरणांत सर्व मंडळी हंसत होती. सृष्टिदेवतेनें नेसलेला हा नवा शालू पाहून कोणाला आनंद होणार नाहीं ? त्या कोंवळ्या किरणांत कोंवळ्या मुली शाळेंतून परत येत होत्या. त्यांचे कुरळ कुंतल वायुदेवता कुरवाळीत होती. शाळा सुटली म्हणून त्या मुली हंसत होत्या व त्यांच्या पाटीवरील अक्षरेंहि हंसत होतीं. या परकर नेसलेल्या आणि पर—करांत न गेलेल्या सुमन विकासी कळया कोणाच्या हातीं लागतील त्या लागो ! पण त्यांच्या क्षणिक सान्निध्यानें माझ्या दृष्टि-पथावर जो सुगंध दरवळत आहे तो स्मृतिकपाटांत अखंड कायम राहो म्हणजे झालें !

रस्ता जरी पाण्यानें वहात नव्हता तरी माणसांनीं वाहात होता. निर्जीव वस्तूंचे संसारसुद्धां परमेश्वर कसे आनंदांत चालवीत असतो हें आपणांस अशा ठिकाणीं दिसून येईल. गांवांतील व परगांवांतील एवढीं माणसें रोज त्याच्या घरीं येतात पण तो कधीं कंटाळला आहे का ? पाहा ही उदारवृत्ति त्या राजपथाची ! घरीं पाहुणा आल्यावर कपाळाला आठ्या घालणाऱ्या माणसांनीं यांच्यापासून पुष्कळ शिकण्यासारखें आहे.

---

# मासलेवाईक चेहरे-२

## १

पुणें येथील शनिवार पेठेंत गणेश नारायण बापट यांचा मोठा मुलगा यंदा लग्नाचा होता. मुलगा यंदा बी. ए. मध्यें पहिल्या वर्गांत पहिला आल्यामुळें व त्यास अनेक बक्षिसें मिळाल्यामुळें गणेशपंतांना जो कांहीं ताठा आला होता तो विचारूं नका ! गरीब मुलींच्या बापांस ते बेपर्वाईनें उत्तरें देऊन झिडकारीत असा त्यांचा लौकिक होता. यंदा माझी मुलगी लग्नाची असल्यामुळें या स्वारीशीं दोन सवाल करण्याची मलाहि खुमखुमी आली. एके दिवशीं मी व माझे मित्र यशवंतराव असे दोघे बापटांकडे मुलगी सांगून गेलों. आम्ही वाड्यांत शिरून उजव्या हाताला जिन्याशीं जातों तों 'कोण पाहिजे ?' असे माडीवरून मोठ्या कुर्ऱ्यांत उच्चारलेले शब्द ऐकूं आले.

◆ माणसाला आपला बडेजाव व्हावयाला पाहिजे असतो. खोटे देखावे करायला पाहिजे असतात. अधिकार गाजविण्याची हौस असते. ◆ या गोष्टी नेहमी साधतात असें नाहीं. पण या गोष्टींत अपयश येण्याने जितकें दुःख होतें त्यापेक्षाहि जास्त खंत त्या अपयशाला कोणी साक्षी राहिल्यास त्याला वाटते. ◆ आणि त्याचा चेहरा मासलेवाईक होतो !

'गणेश नारायण बापट येथेच राहतात ना ?' मी म्हणालों.

'होय मीच तो. काय काम आहे ?'

'मी आपल्या चिरंजिवांना मुलगी सांगून आलों आहें.'

'अस्सं. हें पाहा, माझा मुलगा यंदा बी.ए.त पहिला आला आहे.

त्याला ५०० रु. चीं नुसतीं बक्षिसें मिळालीं आहेत. आपली तीन हजार रुपये हुंडा द्यायची तयारी असेल तर जिन्याची पायरी वर चढा-नाहींतर सरळ चालायला लागा !'

मी नुसतें 'हुंः' केलें.

'काय हो, हुंः करायला काय झालें ?'

'नाही म्हटलं, एवढं गरीब स्थळ मला नको आहे!'

'म्हणजे काय ?'

'त्याच असं, पांच हजार रुपये हुंडा व पांचशें रुपये करणी घेणाऱ्याकडे मला मुलगी द्यावयाची आहे. तेव्हां एवढं गरीब ठिकाण मला काय होय ?'

## २

आमच्या विमलाबाईंना नटण्यामुरडण्याची लहानपणापासून फार हौस. लग्नापूर्वी त्या आईचें, बहिणीचें, वहिनीचें लुगडेंपातळ नेसून रोज रस्त्यांतून मिरवत ! मनांतला हेतु हा की, लोकांनी म्हणावें 'मुलगी श्रीमंताची दिसते, किती हिचीं लुगडीं पातळें आहेत !' लग्न झाल्यावर रोज नवींनवीं छान छान तलम पातळें नेसावीं, मोत्यांच्या बांगड्या घालाव्या, मोटारींतून हिंडावें वगैरे किती तरी त्यांचीं मनोराज्यें होतीं. पण यजमानांना सारा चाळीस रुपये पगार ! त्यांना कशा हिच्या हौशी पुरवतां येणार ?

विमलाबाईचें ज्या वाड्यांत बिऱ्हाड होतें त्या वाड्यांतील इतर बिऱ्हाडें त्यांच्या मानानें चांगलींच श्रीमंत होतीं. त्यांची राहणी अर्थातच थाटामाटाची. 'जो गुण बाळा तो जन्मकाळा' म्हणतात तेंच खरें. वाड्यांतील बायकांचे उंची पोशाख पाहून यांना मोह उत्पन्न व्हावयाचा. 'यमुनाबाई, तुमचा ब्लाऊज मला कसा ठिक होईल नाहीं ?' असें म्हटल्यावर 'बघा घालून' असें त्या म्हणायच्या. 'उषाताई, तुमचें पातळ मला कसं खुलून

दिसेल ?' असें म्हटल्यावर 'बघा बरं नेसून' असें उषाताई म्हणायच्याच. मग यमुनाबाईंचा ब्लाऊज नि उषाताईंचें पातळ नेसून त्या गांवांत चार ठिकाणीं मिरवून येत ! या त्यांच्या आषकपणामुळें वाड्यांतील बायकांची मात्र त्यांच्या पश्चात् चांगली करमणूक होई.

एकदा अशीच गंमत उडाली. चैत्रांतील हळदीकुंकवाचे दिवस. या दिवसांत जणुं एकमेकींवर छाप पाडण्यासाठीं बायका मारे नटूनथटून जातात. यंदा यमुनाबाईंच्या यजमानांना दरमहा २५ रुपये बढती झाल्या-मुळें स्वारी फार खूष होती. म्हणून आज यमुनाबाईंना ४० रु. चें रेशमी पातळ त्यांनी खरेदी केलें होतें. आज त्यांच्याकडे ऑफिसांतील मंडळी मेजवानीला येणार होती. म्हणून आज कांहीं त्यांना हळदीकुंकवाला जातां येणार नव्हतें. ही संधि साधून विमलाबाई लागल्या लघळपणा करायला ! 'बाई मी मोडतें पातळाची घडी. आज हळदीकुंकवालाच नेसून जातें. आमच्या कुमुदनं माझं नवं लुगडं भिजविलं' (कुणास ठाऊक खरं की खोटं !) 'चांगली सुवासिनी नेसते आहे, नाहीं कसं म्हणायचं, आनंदानं नेसा.' यमुनाबाई म्हणाल्या. झालं ! विमलाबाई नुसत्या होकाराचीच वाट पाहत होत्या. लगेच नवें पातळ नेसून झकपक करीत त्या सान्यांकडे हळदीकुंकवाला गेल्या. सानीणबाईनी विचारलें, 'यमुनाबाई नाहीं आल्या तुमच्याबरोबर ?'

'त्यांच्याकडे आज चार मंडळी यायची आहेत.'

'नवीन घेतलं वाटतं पातळ ?'

'हो.'

'केवढ्याला ?'

'पडले चाळीस का बेचाळीस, नक्की आंकडा नाहीं मला माहीत.'

'बाई, बरीच उडी मारली यजमानांनी. पगार तरी मिळतो का त्यांना

पातळाच्या किंमतीइतका ? ते तर किती साधे राहतात. कोटाला चार ठिकाणीं ठिगळं पडलीं आहेत !'

एवढं नको कांहीं हिणवायला ! परवा गोव्याच्या लॉटरीचं तिकीट काढलं होतं, तर त्यांत इकडे ५०० रु. मिळाले.'

'वा ! मग छान झालं ! आता चांगला कुडयांचा जोड घ्या ! तीं जुनीं द्या फेकून. दिसतसुद्धा नाहींत कानांत घातलेलीं.' इतक्यांत यमुनाबाईंच हळदी कुंकवाला तेथें आल्या. कारण त्यांच्या घरीं मेजवानीला पाहुणे येण्याचें एकाएकीं रहित झालें. त्यांना पाहून विमलाबाई मनांतून वरमल्या, व तेथून पाय काढूं लागल्या. 'घरीं गेल्यावर नेसूंचं पातळ सोडून मग कामाला लागा, उगीच मळायचं ! बरं का, विमलाबाई' यमुनाबाई म्हणाल्या.

'बाई बरंच आहे, तुमचा कां एवढा जुलूम ?' सानीणबाई म्हणाल्या.

'कां म्हणजे ? आजच आणलं आहे मला हें पातळ. अजून आंतला बाहेरचा पदरसुद्धा मी उलगडून पाहिला नाहीं.'

'बाई बरीच आहे कीं लाफ !'

विमलाबाईंनी तेथून पळता पाय काढला.

९

विश्वनाथपंत:—( ओटीवरून ) अग ऐकलंस का !

कुटुंबः—( स्वयंपाकघरांतून ) काय ?

वि०—एक रुपया दे पाहूं. मी जरा सोवळ्यांत आहें.

कु०—मी पण चुलीवर भाजी टेकल्येय.

वि०—पण तुझ्या नेसूं मुकटा आहे. दे लवकर मला, या गड्याला द्यायचाय.

कु०—मजजवळ नाहीं रुपया. माझ्याजवळ कुठले पैसे ?

वि०—वा ! कण्या नाही का विकत तूं ?

कु०—बाई, बरंच आहे ! आताशे आपण गिरणीचे तांदूळ नाही वाटतं

खात. आणि कधी जाडयाच्या भाताची जातीण लाविली तरी कातकरिणी त्या कण्या हातांत नाही धरीत !

वि०—कां ?

कु०—त्यांना झाल्येय कोळंब्याच्या कण्यांची सवय.

वि०—मुलांचे दक्षिणेचे असतील बघ. हाताशीं आले की दोन चार दिवसांत देतों. माझे यायचे आहेत पैसे. सराई येऊं दे. पैशाची नुसती धार लागेल !

कु०—बाई, शिकस्तच आहे. कधधी म्हणून दिडकी हाताला लागूं द्यायची नाही. आला पैसा कीं हें नाही तें कारण सांगून काढून घ्यायचा. ओवाळणीचा का कशाचा शपथेलासुद्धा पैसा जवळ नाही राहात. मी पुढल्या वर्षी भावाला आपली सांगणार आहें—

वि०—काय ?

कु०—हो आलं वरीस अस्सं चाललाय; भावानी ओवाळणी घातलन् कीं तोच रुपया घेऊन बहिणीला ओवाळायला जातां !

वि०—( रागावून ) ब...र !

कु०—बरं काय ? पुढल्या वर्षी सांगणार आहें, कीं मला जसा रुपया ओवाळणी घालायला आणतोस तसा यांच्या बहिणीला पण येतांना एक रुपया घेऊन ये. म्हणजे माझ्याऐवजीं तोच तुम्हाला देईल व माझा त्रास चुकेल !

## १०

आण्णाः—( आपल्या मुलास ) काय, लावलेत एकदाचे दिवे ! आता चक्क घरीं बसा. मला मुळीच त्याची लाज नाही. डोळ्यावर कातडं ओढून तुला पैसे पाठवीत होतों. तुझे अजून नाही डोळे उघडावयाचे, भीक मागशील तेव्हा उघडतील. बाकी तुझ्या नशिबांत भीक आहे त्याला तूं काय करणार ! छे छे ! या शिक्षणाचा मला अगदी वीट आला. एखादं

देऊळ बांधलं असतं तर सत्कारणीं तरी पैसा लागला असता. पण येथें पाप ना पुण्य. हाडाची काडं करून पैसा मिळवतों नि त्याची तूं अशी वाट लावतोस. माजला आहे पाहा कसा लठ्ठया ! ओठ पाहा त्याचे विडग्या ओढून कसे काळे झाले आहेत. खुश्शाल घरीं बस.

कुटुंबः —पण बोलायचं तरी किती, कांहीं सुमार ?

आण्णाः—तूंच त्याला शेंरडावून ठेवला आहेस.

कु०—मी काय शेंरडावून ठेवला ? त्यानं अभ्यास थोडा का केलान् ? पोर येथें आला तेव्हां त्याचे गालसुद्धा बसले होते. नाही उतरली परीक्षा त्याला तो काय करणार ?

आ०—सबंध वर्षभर उंडारायचें नि मग बसायचें पुस्तकांत सारखें डोकें खुपसून. ही का अभ्यासी मुलांचीं लक्षणें. हजार वेळां पत्रांत लिहिलें असेन कीं, रोज नियमान दोन तास अभ्यास कर म्हणून. ढीग पडला असता अभ्यासाचा !

कुटुंबः—तुम्ही पाहायाला गेलां होतां तो करीत होता का नव्हता तो ? मेल्यांनो, पोर वाळून गेलाय अगदी !

आण्णाः—बरं, पुण्याला काही कमी कां होतं याला. अगदी इकडची काडी तिकडे ठेवायला नको. राजासारखी याची व्यवस्था ठेवली होती. लोकांचीं मुलें वार लावून नि म्युनसिपालिटीच्या कंदिलाखालीं अभ्यास करून शिकतात.

कुटुंबः—न शिकून काय करतील ? घरीं काय बापानं पुरून ठेवलं आहेन् त्यांच्या. आणि राम तर म्हणतो सगळ्या पुण्याभर आता वीज झाली आहे. आहेत कोठे कंदील ? आहे मुलगा म्हणून बोलत आहां. ते भाऊ गोखले कुणाला बोलतील ? ना पोर ना बाळ.

आण्णाः—तुम्हीच त्याला फूस आहे. तो भिडयांचा वासू पहा दरवर्षी परीक्षा पास होत आहे. बी. ए. पास होईल तो यंदा: शेण खा थोडं.

कुटुंबः—( रागाने लाल होऊन ) राम, तूं ऊठ पाहूं तेथून. त्याशिवाय त्यांचं तोंड बंद व्हायचं नाहीं. कांही बोलण्याला सीमा हवी का नाही ? इकडे तरी दरवर्षी उतरत असे का परीक्षा !

आण्णा:—मला अपयशाचा अगदी राग आहे. माझ्या विद्यार्थिदशेंत मी एकदाहि नापास झालों नाही.

बाबा:—( आण्णांचे वडील ) ऐकतों आहें मी या खोलींत बसून. हा आण्णाच कां बोलतो आहे ? अरे सात वेळां वकिलीच्या परीक्षेंत नापास झाला आहेस म्हणून बरी गत आहे. या हातांनीच मी नोटा मोजून तुला दरवर्षी पाठविल्या आहेत !

## ११

पुणें येथील सदाशिव पेठेंत केस कापण्याचें दुकान व परिटाचें दुकान शेजारीं शेजारीं होतें. या दोन्ही दुकानांतील मंडळी रोज संध्याकाळीं काम आटोपल्यावर गप्पा मारीत बसत. एके दिवशीं या मंडळींना आपला सर्वांचा फोटो काढण्याची इच्छा झाली. ऐट केल्याशिवाय फोटो कसला ? तेव्हा महादबा परीट म्हणाला,

" विठुदा, तुमी आमच्या दुकानांतील समद्यांचे केस फुकाट कापुनशनी द्यायच आनि त्येचे बदली मी तुमाला पोटु काढायला कपडे बी पुरवायच; हाय कबूल ? "

महादबाची युक्ति सर्वांना पसंत पडली. विठोबा न्हावी आनंदाने ' व्हय हाय कबूल ' म्हणाला.

मग दुसरे दिवशीं दुपारीं विठोबाने सर्वांचे ऐटदार केस कापले. सर्वांनी केसांना पोमेड चोपडून ते तुळतुळीत केले. मग भांग पाडून तोंडांना पावडर मारून ते महादबा परटाच्या दुकानांत गेले. तेथे सर्वांनी इस्तरी केलेले शर्ट घातले. दोन रेशमी शर्ट होते, ते महादबा व विठोबा यांनीं घातले. मग कोणी सिल्कचा तर कोणी वुलनचा, कोणी ब्लेझरचा तर कोणी पपलिनचा

कोट चढवला. व बोडक्यानेच एकमेकांकडे डोळे मिचकावीत ते बुधवारां-तील फोटोग्राफरकडे गेले.

ते गेले त्या वेळीं फोटोग्राफर चहा पीत होता. त्याने उठून या मंडळींचें स्वागत केलें. मंडळी श्रीमंत दिसतात असें समजून त्याने सहा कप चहा बोलावला. चहा प्याल्यावर कुटलेली सुपारी सर्वांना देऊन त्याने सिगारेटचें पाकीट सर्वांपुढे केलें. प्रत्येकाने सिगारेट पेटविली. फोटोग्राफरने त्यांना दहावीस निरनिराळ्या तऱ्हेचे फोटो दाखविले. व कोणत्या तऱ्हेचा फोटो काढावयाचा तें विचारलें. त्यांतील एक तऱ्हा त्यांना पसंत पडली. लगेच फोटोग्राफर आंतल्या खोलींत फोटो काढण्याची तयारी करण्याकरतां गेले. जरा वेळाने सर्वांनाच आंत बोलावलें. फोटो काढून झाल्यावर ‘ उद्या सकाळीं तुम्हाला निगेटिव्ह पाहायाला मिळेल, कोणाला तरी पाठवा पाहा-यला ’ असें फोटोग्राफर म्हणाला. इतक्यांत मधुकर गुप्ते तेथें आला. महा-दबा व विठोबा त्याच्या ओळखीचेच होते. कारण या दोघांचीं दुकानें कॉलेज विद्यार्थ्यांचीं अगदी आवडतीं होतीं. त्यांना पाहून मधुकर हंसत म्हणाला, ‘ काय महादबा, काय विठोबा, आज फोटो काढायला आलां काय ? अरे वा, ऐट तर मोठी केल्येय. विठोबा आम्ही आठ आणे देऊनसुद्धा तूं आमचे एवढे चांगले केस कापीत नाहीस. किती छान केस कापले आहेस, या मंडळीचे आणि महादबा, तूं आपल्या दुकानांतले कपडे दिले आहेस वाटतं मंडळींना ! अरे हें काय, हा तर माझाच कोट घात-लाय वाटतं शिदबांनी ! वा, अगदी ओव्हर बाऊंड्री मारलीस ! ’

## १२

दुर्दैव एकदा पाठीमागे लागलें की सारखें हात धुऊन पाठीमागें लागतें. माझा एक मारवाडी मित्र गेलीं दोन तीन वर्षे सारखा आजारी होता. शरिराप्रमाणें तो मनानेहि खंगला होता. शेवटीं त्याचें दुखणें क्षयावर गेलें. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. डॉ. भडकमकर दोनदा येऊन तपासून गेले. त्यांच्या नेहमीच्या डॉक्टरला काय औषधयोजना करावयाची

तें त्यांनी समजाऊन सांगितलें. रोज पोटांत औषध देऊन ते माझ्या मित्राला गोल्डचीं व कॅल्शमचीं इंजेक्शनें देऊं लागले. माझा मित्र घरचा लक्षाधीश होता; पण त्याचा बाप अगदी कद्रू होता. शिरेंतल्या गोल्डच्या इंजेक्शनची फी दहा रुपये जेव्हा त्याने ऐकली तेव्हा जें कांही आंबट तोंड त्याने केलन् कांही विचारूं नका. पण या दहा रुपयांतील निदान पांच–सहा रुपयांचें सोनें तरी शरिरांत राहील, व्याज मिळणार नाही एवढेंच, अशी त्याची समजूत होती. होतां होतां मुलाला एक वर्षांत गोल्डचीं ४२ व कॅल्शमचीं ४० इंजेक्शनें झालीं पण गुण काहीं येईना. कारण रोग्याचा तापच मुळी हटेना. वजन वाढण्याचें तर नांवच नको- फक्त एक महिन्याला चार तोळे वजन वाढल्याचें डॉक्टरने सांगितलें होतें ! पण वजन घेण्याच्या वेळीं त्याच्या कनवटिला चार रुपये होते ! शेवटीं एके दिवशीं त्याने या जगाचा शेवटचा निरोप घेतला. त्या दिवशीं मी बाहेर गांवीं असल्यामुळें त्याच्या प्रेतयात्रेला मला हजर राहतां आलें नाही. मी पुण्यास आल्यावर मला ही दुःखदायक वार्ता कळली. माझ्या जिवलग मित्राची व माझी शेवटची भेट झाली नाही म्हणून चुटपुट लागली. त्या दिवशीं संध्याकाळीं ज्या स्थळीं त्याच्या देहाची राख झाली त्या राखेचे अखेरचें दर्शन घेण्यासाठीं मी स्मशानांत गेलों. त्या स्थळीं जातों तों माझ्या मित्राचे वडील तेथें राख चिवडतांना दिसले. मला वाटलं एकुलता एक मुलगा गेला म्हणून म्हाताऱ्याला वेड लागलं. म्हणून मी विचारलं,“ पोमाशेट. हें काय चाललं आहे ? ” मला पाहून तो ओशाळला व म्हणाला, “ अहो मुलाला डॉक्टरांनी ४२ गोल्ड इंजक्शनें केली. तेव्हां निदान ३०० रुपयांचा सोना तरी त्याच्या शरिरांत होता आणि सोना कुठेबी असला तरी नाहीसा होत नाय. म्हणून राखेमंदि सापडला तर बघतो हाय ! ”

## १३

आता माझ्या एका जिवलग मित्राचीच गोष्ट सांगतों. माझे मित्र एक होतकरू विनोदी लेखक आहेत. ते व मी कॉलेजमध्यें बरोबरच शिकत होतों.

मीहि थोडासा गमत्या असल्यामुळें त्यांची व माझी लवकरच गट्टी जमली. कालेजच्या रंगेल वातावरणांत त्यांच्या विनोदी स्वभावाची कळी चांगलीच खुलली. वर्गांत ते नेहमीं कोट्या करून मित्र–मंडळींना हसवीत. वर्गात प्रोफेसर्सना तऱ्हेवाईक प्रश्न विचारण्यांत यांचा हातखंडा असल्यामुळें हास्य-गंगा तेथें सदैव अवतरत असे. यांच्या व्याख्यानाच्यावेळीं तर हास्यगंगेला महापूरच येई, या लोकप्रिय व्यक्तीकडे कॉलेजांतील मुली कुतुहलाने पाहात. कोणी पाहतांना हसत, तर कोणी हसतहसतच पाहात ! त्या सरळभावानें हसत का कशा हसत मला तरी काय माहीत ? पण माझ्या मित्राची अशी वेडी समजूत की, त्या सर्वजणींचें त्याच्यावर प्रेम आहे. विशेषतः त्यांतील एकीच तर आहेच आहे. असेलहि कोणी सांगावें ?

एकदा काय झालं माझ्या मित्राला एक विनोदी लेख कॉलेजच्या त्रैमासिकांत लिहावयाचा होता.

लेखांत कॉलेजांतील मुलींसंबंधीं कांहीं मजकूर घालावयाचा होता. तेव्हां अशावळीं आपणावर प्रेम करणाऱ्या मुलींशीं बोलण्याला ही नामी संधि आहे असें त्यास कां नाहीं वाटणार ? तो मला म्हणाला,“ गड्या कांहीहि होवो, आज तिच्याशीं मी बोलणारच आणि माहितीहि मिळेविणारच. पण दोस्त तूंहि मजबरोबर आलं पाहिजेस. मुलीशीं बोलण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग. मी थोडासा शाय आहे. तेव्हां तूं आलंच पाहिजेस ! ” अशा प्रसंगीं आपल्या मित्राला कोण उपयोगी पडणार नाहीं ? मीं ताबड-तोब रुकार दिला.

आम्ही आमच्या कॉलेजच्या लायब्ररींतच तिला भेटण्याचें ठरविलें, त्या वेळचा माझ्या मित्राचा शोक कांहीं विचारूं नका. त्याच्याकडे पाहून ‘ एक नूर अदमी नि दस नूर कपडा ’ ही म्हण कोणालाहि समजावून द्यावी. त्याने खिशांतील रुमालाला व रेशमी कोटाला इतकें अत्तर चोपडलें होतन् कीं त्याचा सुवास सहज फर्लांगभर पसरला होता. त्याने लायब्रेरियन

मार्फत तिला गड्याबरोबर चिठी पाठविली. चिठी पाठवल्यावर माझ्या मित्राचीं तीं चारपांच मिनिटें कशीं गेलीं असतील कांहीं विचारू नका. आत्ता येईल, ही आलीच. म्हणून जिन्यावरून चपलांचा गोड आवाज झालेला ऐकून तो पाहुं लागला, तों आपला एक कॉलेजमधील विद्यार्थीच ! पण दोनचार मिनिटांत गडी खाली येऊन म्हणाला, ' साहेब त्या रेशि-डेन्र्शींत गेल्या. धा मिंट झालीया. ' मित्राने आंबट तोंड केलेंच. पण पुन्हा धीर धरून तो म्हणाला ' आपण तिला वसतिगृहांतच चिठी पाठवून बोलावूं. ' त्याने एक चिठी लिहून लायब्रेरियन जवळ दिली. त्याने लगेच गड्याबरोबर ती मुलींच्या वसतिगृहांत पाठविली. पण दहापंधरा मिनिटांनी गड्याने चिठी आणली ती अशी.

Miss Kusum is not in her room.
—Miss Vimal for Miss Kusum. '

ती चिठी पाहून माझ्या मित्राचें तोंड उतरलेंच. त्याच्यादेखत लायब्रे-रियन गड्याला म्हणतो, ' ती चिठी तू कोणाला दिलीस ? त्या चष्मा घालतात त्यानाच ना दिलीस ? ' ( त्याची मैत्रिण चष्मा घालीत होती. ) गडी म्हणाला 'व्हय त्यांनाच दिली. चिठी वाचल्यावर जरा वेळ कपाळा-वर फाउन्टान टेकूनशनी त्यांनी इचार केला अन् त्यांणींच लिहूनशनी ही चिठी दिली.'

आता आणखी शोभा व्हायची ती काय राहिली ? मी व माझा मित्र बरकरणीं हसत तेथून निघून आलों.

---

# पुण्यांत वर-संशोधन

पुण्यांत सबंध वैषाख महिना अनेक दृष्टींनीं मोठ्या खळबळीचा जातो. या दिवसांत माणसाचा जीव कशानें जात असेल तर उकाड्याने. प्रत्येक माणसाचें शरीर भाताप्रमाणें शिजत असतें. रात्रीं बारा वाजेतों डोळ्याला डोळा कसा तो लागत नाही. मनुष्य या कुशीचा त्या कुशीला सारखा होत असतो. काळोखांतच अंथरुणावरील ढेकूण शोधित असतो. चापटीनें डांस मारीतच असतो. आणि हीं अवधानें संभाळून एकीकडे निद्रादेवीची आराधना करीत असतो.

ही झाली सामान्य जनांची स्थिति. पण मुलीचा बाप दिवसभर फिरफीर फिरून अगदीं घामाघूम होत असतो. आणि कोठेंहि न जमल्यामुळें कपाळावरील घाम उपरण्यानें पुशीत नशिबाला हात लावीत असतो. दिवसभर वणवण हिंडून थकल्यामुळें रात्रीं पडल्या पडल्या झोंप येईल असें त्याला वाटतें. पण उशीवर डोके टेकल्यावर निराळाच अनुभव त्याच्या प्रत्ययास येतो. मुलीच्या लग्नाची काळजी हळूच त्याच्या जवळ येऊन रात्रीं दोन वाजले तरी कानगोष्टी करीतच असते.

या महिन्यांत मोठ्या प्रमाणावर कशाची उलाढाल होत असेल तर ती नाजूक फुलांची ! कितीतरी नवीन तऱ्हेतऱ्हेचीं रंगीबेरंगी फुलें लांबलांबून पुण्यास येतात. तर अनेक सुंदर फुलें येथून बाहेरगांवीं रवाना होतात. उलट पुण्यांतल्या पुण्यांतच कांहीं फुलांची देवघेव होत असते. एका पेठेंतील नाजूक फुलें दुसऱ्या पेठेंत जातात. तर दुसऱ्या पेठेंतील टंटणीची फुलें पहिल्या पेठेंत येतात. हीं फुलें ज्यांनीं जिवाभावानें आजवेरीं जतन केलीं, त्यांच्या सुखदुःखाची काळजी वाहिली तीं फुलें सुस्थळीं पडण्यासाठीं त्यांची कोण धडपड चाललेली असते ? !

पुण्यांत आंब्यांच्या मोसमाप्रमाणेंच लग्नाचाहि मोसम जारीचा. जिकडे कीर्तीचा व गुणांचा जास्त सुवास येईल तिकडे मुलीचा बाप तिराच्या

वेगानें जावयाचा. या दिवसांत कोणत्याहि पेठेंत हिंडलें तरी कितीतरी अनोळखी चेहरे दृष्टीस पडतात. साधारण पंचविशीच्या आंतला मुलगा पाहिला कीं हे चेहरे त्याच्याकडे निरखून पाहूं लागतात! एकदां एका अनोळखी मुलीच्या खेडवळ बापानें 'तुमचें लग्न झालें आहे काय?' म्हणून भर रस्त्यांत मला विचारलें! मी अर्थात् होकार दिला, तेव्हां सदर गृहस्थाचें तोंड उतरलेंच; पण पुन्हां उमेद धरून तो म्हणाला, 'तरी पण तुम्हीं तरुण आहां, तुमच्या माहितीचीं स्थळं असणारच. मी टिपून घेतों कागदावर. मला पत्ते सांगा. मिस्टर माझ्यावर जरा मेहेरबानगी करा. चला आपण शेजारच्या गुऱ्हाळांत रस घेऊं.'

मीहि खेडयांतलाच असल्यामुळें मला त्या गृहस्थाविषयीं सहानुभूति वाटली. पण उसाच्या गुऱ्हाळांत असलें गुऱ्हाळ लावण्याऐवजी घरीं गेलेलें काय वाईट! म्हणून सदर गृहस्थांना मी माझ्या घरीं घेऊन गेलों. बायकोनें खुणा कर करून मला सतावल्यामुळें 'हे कोण' हें मी बसल्या जागेवरूनच सांगितलें व दोन पेले चहा ठेवण्यासहि सुचविलें.

'काय करावं, मिस्टर—हो पण असें मिस्टर किती वेळ म्हणणार? तुमचें नांव काय?'

'माझं नांव सोमण; अर्थात् ओघाने—'

'हो आलेंच. माझं नाव भिडे, मी माखजनचा राहणारा. काय करूं. आज चार वर्षे सारखा धडपडत आहें, पण कुठं म्हणून जुळत नाही. नुसते ४०० रुपये ठिकाणं शोधण्यावारी गेले. घरीं गेलों की, मुलीचं कोठें जुळल्याशिवाय बायको क्षणभर ओटीवर बसूं देत नाही. अगदीं मेटाकुटीला आलों आहें. पुण्यास येऊन सुद्धां उद्या आठ दिवस होतील, पण अजून नमनाला सुद्धां सुरुवात नाहीं. हे हजार रुपये, ही मुलीची कुंडली, हा तिचा फोटो घ्या आणि तुम्ही एकदां लग्न जुळवून द्या. (आंबट तोंड करून) बिजवर असला तरी चालेल.

हात टेकले या लग्नाच्या बाबतींत. गावांत मला तोंड काढायला जागा नाहीं !'

'अहो, जरा धीर धरा. ही का पत्त्यांतल्या राजाराणींचीं लग्नें आहेत. पत्त्यांतलीं राजाराणी एकाच रंगाचीं असल्यामुळें त्यांचीं लग्नें ताबडतोब जुळतात; व दहा वर्षांचीं गृहस्थाची मुलें सुद्धा उपाध्याचें काम करतात ! होम नाहीं, हवन नाही, अगदीं रजिस्टर मॅरेज. कारण खेळांतील दोघेजण साक्षीला असतातहि !'

'वा ! ! तुम्ही फार मजेशीर बोलतां ब्रोवाँ'

'बरं, लग्न जुळवितांना यांच्या जातगोताची कोणी चौकशी करतो का ? या राजाराणीचे आईबाप कोण, याची कोणाला तरी माहिती आहे का ? बरं लग्न झाल्यावर पहिल्या खेपेला राणीसाहेब माहेरी गेल्या होत्या किंवा नाहीं याचा शोध कोणा इतिहाससंशोधकांनी लावला आहे का ?'

'जाऊंद्या झालं. आपल्याला काय करायचं आहे त्या राजघराण्यांतील स्त्रीपुरुषांशीं. आम्ही सरळ व्यवहारी माणसं, मुद्याशीं गांठ. तुम्ही आमच्या यमीकरितां ठिकाणं सांगा.'

'हो, पण तुम्हाला मुलगा कसा हवा ? तुमची मुलगी कशी आहे ?'

'तो फोटोच सांगेल माझी मुलगी कशी आहे तें !'

'अहो, फोटो ही शुद्ध धुळफेक आहे ? फोटोशींच जर माणसांची लग्नें लावावयाचीं असतीं तर आजवेरीं फोटोंतली एकहि मुलगी नापसंत ठरली नसती. यांत काय तें समजा. कारण विधात्याच्या कृतीवर फोटोग्राफरने आपल्या हस्तकौशल्याची ताण न केली तरच नवल !'

'छे ! छे ! इथे ती लबाडी नाही बरं का, अगदीं फोटोबरहुकूम मुलगी असली म्हणजे झालंना ? नसली तर माझ्या पदरांत माप घाला.'

फोटोवरून मुलीचे नाकडोळे तरतरीत दिसतात; पण मुलीचा रंग कसा आहे ? त्यावर तर ठिकाणाचा रागरंग अवलंबून. मुलगी उजळ असली उजळ तर उजळमाथ्यानं कोणाकडे जातां येत.'

'अहो, उजळ कां चांगली पिठ्ठ गोरी आहे.'

'म्हणजे उजळ आहे हें धरून चालायला हरकत नाही.'

'पुन्हा तेंच. मी खोटं का बोलतों?'

'तुमची गोष्ट सोडून द्या.' पण एकंदरींत मुलीच्या बापाकडून ऐक-लेल्या मुलीच्या वर्णनांत व प्रत्यक्ष परिस्थितींत जमीनअस्मानाची तफावत असते. बरं, मुलगी उंच का गिड्डी आहे? स्थूल आहे का किडकिडीत आहे. त्याप्रमाणें ठिकाण सांगायला बरं, हो! नाही तर नवराबायकोचा जोडा आपला दहाच्या आंकड्यासारखा दिसायचा!'

'मुलगी मध्यम चणीची आहे. कोणाच्याहि डोळयांत सहज भरेल अशी आहे.'

'सदाशिव पेठेंत दात्यांचा एक मुलगा आहे. मुलाला आईबाप आहेत. वडिलांना १५० रु. पगार आहे. मुलाचे तिघे भाऊहि मिळवते आहेत. एक वकील, एक डॉक्टर व एक ओव्हरसिअर आहे. दोन बहिणीहि चांगल्या ठिकाणीं पडल्या आहेत.'

अहो, पण मुद्याची गोष्ट तेवढी वगळलीत. नवरा मुलगा काय करतो? इतरांना आम्हाला काय चाटायचे आहे?

'नवरा मुलगा मात्र घरींच असतो. फारसा शिकलेला नाही. पांचवींत त्यानें शाळा सोडलीन्. सध्यां तो भावाच्या दवाखान्यांत 'कंपाउंडिंग' शिकतो आहे.'

'म्हणजे दवाखान्यांत नोकरी करतां करतां मुलगा जरी म्हातारा झाला तरी त्याचा पगार सदोदित ऐन तारुण्यांतच राहणार! अगदींच कनिष्ठ दर्जाचें ठिकाण सोडून द्या. दुसरं सांगा.'

'दुसरा एक रानड्यांचा मुलगा आहे. स्थळ उत्कृष्ट आहे. एकटा मुलगा. मालकीचा वाडा. स्वतः राहून दरमहा ७५ रु. भाडें येतें. जवळ थोडी मायाहि आहे; पण मुलगा एकाक्षी आहे, देवीनं त्याचा एक डोळा

गेला, आणि चालतांना पायांत किंचित् चमक मारते, बाकी तशी कांही ठिकाणांत खोड नाही.'

'अहो चमक कसली' तो लंगडाच असला पाहिजे. तरीहि मी पत्करला असता; पण आमच्या 'हिच्या' अटी फार. मुलगा अव्यंग, दिसण्यांत बरा व घरचें थोडेंफार असलें पाहिजे असें तिनें मला अगदीं बजावून ठेवलन् आहे. म्हणून हें ठिकाण फुकट गेलें.'

'दुसरा एक मुंजाबाच्या बोळांत लिमयांचा मुलगा आहे. स्थळ काय शंभर नंबरी आहे. मुलगा पंचविशीच्या आंत. देखणा इतका कीं, क्षणभर पहातच राहवं त्याच्याकडे. मालकीचे तीन वाडे. बँकेंत १०००० रु. आहेत. मुलीच्या अंगावर पोतपेटया सुद्धां दागिने पडतील. सासुसासरा चांगलीं स्वभावानं शालीन. आणि मुलाच्या बापाचा आग्रह हा कीं, पै म्हणून मुलाचा हुंडा घ्यायचा नाहीं !'

'अहो, असलं ठिकाण म्हणजे डर्बी लॉटरीचं बक्षिस ! कितीक लोकांच्या उडया पडल्या असत्या या ठिकाणावर; पण ज्या अर्थी अजून मुलगा लग्नाचा राहिला तेव्हां त्याच्यांतच कांहीं तरी दोष असला पाहिजे !"

'अहो लोकांच्या तोंडावर कां हात द्यायचा आहे ? मुलगा चांगला बोलतो चालतो. सिनेमाला जातो, स्वतः पैसे देऊन तिकीट काढतो ! तरी लोक म्हणतात मुलगा वेडसर आहे !'

'हं ऽऽ लोक म्हणतात ! तुम्ही म्हणत नाहीं. बाकी मी पहातों आहें सोमण, आतांपर्यंत तुम्ही सांगितलेलीं ठिकाणं पाहिलीं म्हणजे लंगडे, वेडे, मुके यांचीं लग्नें जुळविणारे तुम्ही कमिशन एजंट असावेत असा मला दाट संशय येतो.'

'वा ! वा ! आतां खूप केलीत ! मी सरळ भावानं तुम्हाला एक एक ठिकाण सांगतों आहे. राहिलं बोवाँ. उगीच वाभंग कशाला !'

‘ आपल्या यमुनाबाईचा मुलगा नाही कां लग्नाचा ? ’

‘ अरे हो, खरंच की ! मी अगदींच विसरलों. अग पण एवढा वेळ तूं ऐकतच उभी आहेस वाटतं तेथें ! वा ! ’

‘ अहो, लग्नाच्या गोष्टी निघाल्या कीं, बायका अगदीं तल्लीन होतात. आमची ‘ ही ’ सुद्धां अशीच ऐकत उभी राहते. ’

अहो, मुलगा आमच्या वाड्यांत राहतो. दिवसांतून चार वेळां आमच्याकडे येतो. यंदाच बी. ए. झाला, एम्. ए. चा अभ्यास करीत आहे. आईबाप आहेत. घरची स्थिति बेताबाताची. पण मुलगा काय आहे ? ’

‘ मुलगा एकदां नजरेखालून घातला व त्यास चार–दोन प्रश्न विचारले कीं मी तावडतोब मुलाचा अंदाज करीन. अहो, कोर्टांत भांड-भांडून प्रश्न कसे विचारावे यांत आमचा अगदीं हातखंडा आहे. बरं मुलाचं आडनांव काय, गोत्राशीं जुळतें कां नाही ? ’

‘ तुमच्या गोत्राशीं त्यांचें पटतें. नांव विष्णु वामन काणे. बघा, नांव घेतांच विष्णु हजर आहे. ये विष्णू बस, खुर्चीवर बस. हा मुलगा. विचारा तुम्हाला कांही विचारायचें असेल तर !

‘ वा ! तात्या हा भला रोजगार ! कांही ओळखदेख नसतां हे कोण मला प्रश्न विचारणार ? ’

‘ मी सांगेन मग तुला. सध्यां तू आपली उत्तरें दे. ’

‘ आपलं वय काय ? ’

‘ वय चोवीस. ’

‘ उंची ? ’

‘ पांच फूट सहा इंच. ’

‘ वजन ? ’

‘ वजन ८० पौंड. ’

‘ छाती ? ’

‘ २७ इंच, फुगवून २८ इंच. ’

‘ नाडीचे ठोके ? ’

‘ मिनिटाला ९२. ’

‘ विष्णु तुला नाडीचे ठोके सुद्धा माहीत आहेत ना ? शाबास तुझी ! ’

‘ अहो तात्या; कालच माझी कॉलेजमध्यें शारिरिक तपासणी झाली. म्हणून सर्व माहिती अगदी ओठावर आहे.

‘ चष्म्याचा नंबर ? ’

‘ उणे १५ कांपाउंड ग्लास. !

‘ डोक्यावरचे केस ? ’

‘ हिमाच्छादित ’

‘ दुग्धाहार ? ’

‘ रोज अर्धा अधिक कप पोटांत जातें. कारण चार वेळां चहा घेतों.

‘ स्नान ? ’

‘ स्नान एकदा. पण मुखस्नान दोनदा. कॉलेजांत जाण्यापूर्वी व फिरावयास जाण्यापूर्वी. ’

‘ नमस्कार ? ’

‘ सबंध दिवसांत १५–२० पण त्यांत एक हाताचेच जास्त. जसा मनुष्य भेटेल तसा त्यास नमस्कार करावयाचा ! ’ ’

अहो, नमस्कार असो तुम्हाला ! तुम्ही व्यायाम काय घेतां ? ’

‘ संध्याकाळीं गावांतून हिंडतो ! ’

‘ मालिश ? ’

‘ मालिश फक्त तोंडालाच हेंजिलिन स्नोचें ! ’

‘ धूम्रपान ? ’

‘ रोज सहा गोल्ड फ्लेक. मित्रमंडळी जमल्यास एकदोन जास्त. ’

' कपडे ? '

' अन्डरवेअर, वर शर्ट; त्याच्यावरून पुल-ओव्हर, वर अर्थात् डबल ब्रेस्ट, ही चतुरंग सेना असते तेव्हा कोठे बरा दिसतों, व थोडी तरी छाप पडते ! '

' वडिलार्जित इस्टेट ? '

' खोकला ! '

' खोकला ! '

' अहो म्हणजे कफल्लक ! भिऊं नका, मला कांहीं T. B, नाही. '

' पुढील आयुष्याचें ध्येय ? '

' नोकरी. '

' तुम्ही भावी पिढीचे आधारस्तंभ. '

' छे ! छे ! निराधार स्तंभ ! '

' तुम्हाला लग्न करावयाचें आहे का ? '

' अलबत, अशी गोरी फाकडी बायको करीन कीं यँव ! '

' अहो, तारुण्यांतच काय ही तुमची दशा ! '

अहो, बोलून चालून आम्ही बुद्धिजीवि माणसें; आम्हाला थोडेंच गामाकल्लू व्हावयाचें आहे ? तुम्ही आम्हांला बौद्धिक काम वाटेल तेवढे सांगा. पण कृपा करून शारीरिक कष्टाचें काम सांगू नका ! '

' पण मी तेंच तुम्हाला सांगणार आहें. विडा चघळीत कपड्यावर तांबडे डाग सांडण्याचे आता दिवस राहिले नाहीत. रक्ताची चिरकांडी अंगावर उडण्याचे दिवस आता येणार आहेत ! '

' तुम्ही तर क्रान्तीची भाषा बोलूं लागलां, अरे वा ! '

' माणसाच मणगट दणकट पाहिजे. आणि तुम्ही माझ्याशीं नुसतें अर्धा तास बोललां तों तुम्हाला दम लागला ! तुम्हीच सांगा, सोमण, कशी मी यांना देऊं माझी मुलगी ! '

' अस्सं ! एकूण आपण मुलीच्या लग्नाच्या खटपटींत आहांत तर ! आपण कोण ? कोठले ? '

' मी भिडे. मालजनचा राहणारा. '

' म्हणजे कोंकणचे. आलां तसेच हात हालवीत परत जाल झालं. तुम्ही व्यर्थ द्रव्यापव्यय व कालापव्यय करतां झालं ! '

' म्हणजे ? मी समजलों नाहीं आपल्या बोलण्याचा अर्थ. '

' मी खरं सांगूं, तुमचा वाण येथे पटावयाचा नाही. 'बोलूनचालून तुमचं खेडवळ सणंग. येथे किती तरी उंची सणंगें, रंगीबेरंगी तलम पातळें आहेत ? त्यांचा मोह सोडून हा खेडवळ वाण कोण पत्करणार ? बरं आहे अच्छा, नमस्कार, येतों मी. कॉलेजाला जावयाचें आहे. '

' सोमण आता तुम्हीच सांगा. आहे का नाही हा पाध्याचें पितर ? याच्या फक्त तोंडाचा पट्टा पाहून घ्यावा. '

'बाकी भिडे, विष्णु म्हणाला तें कांही खोटं नाही.येथे दरवर्षी कोकणची कित्येक मंडळी ठिकाण पाहायला येतात आणि ८।१५ दिवस चैन करून मात्र जातात. तुमचं इथ जुळावयाला जरा कठीणच आहे. '

' अहो, न जुळायला काय झालं ? आता खेड्यांतल्या मुली पहिल्या-सारख्या राहिल्याच नाहीत. इंग्रजी लिहिण्यावाचण्याचं सोडून द्या. पण एरवी शहरांतल्या नि खेड्यांतल्या मुलींत काय फरक आहे ! '

' काय फरक आहे ? तुमच्या मुलीला 'गोल' नेसतां येतं का ? हल्लीची ती फॅशन आहे. '

' तिनं कशाला पाहिलन आहे गोल. पैठणी शालूप्रमाणें ' गोल ' हें नवीन तऱ्हेचें सणंग आहे काय ? माझ्या तर ऐकिवांत नाही. '

' नाही हो. गुजराथी बायका नेसतातना त्या प्रमाणें तिला नेसतां येईल का ? '

' माझ्या यमीला नाही हो हे ढंग यावयाचे ! आपलं दक्षिणी चालीचं लुगडं तिला नेसतां येत. आणि तें न चांगलं. '

तिनं पाठीवर शेपटा सोडून लाडिक हावभाव केले पाहिजेत. शेपट्याला रंगीबेरंगी रिबीन नाही तर रेशमी गोंडा लाविला पाहिजे.'

'छे! छे! माझ्या यमीला नाही हें जुळावयाचें. माझी पोर किती साधी आहे.'

'सदा सर्वकाळ तिनं तोंडाला सुवासिक भस्म चोपडलं पाहिजेन्. भिवयांना, पापण्यांना काजळ लावून त्या काळ्याभोर करून ओठांना तांबडा रंग लावला पाहिजे.'

'म्हणजे तुम्ही म्हणतां काय? अहो हें थेर करून जायचं कुठं? सिनेमा नटी का व्हायचय? माझी पोर कपाळावर फक्त ठसठशीत कुंकू लावील; ही धूळ तोंडाला नाहीं फासावयाची. लावला ना तर कधी अंगारा लावील कपाळाला! पण मला राहून राहून आश्चर्य वाटतं हे शोक करून जायचय कुठं यांना मिरवायला!'

'अहो, पत्नीने आपली वेशभूषा आकर्षक केली नाही तर लवकरच त्यांचं बिनसतं म्हणतात. पहिल्यासारखं प्रेम राहत नाही!'

'म्हणजे आश्चर्य आहे, बोवाँ! अहो प्रेम हे फेसपावडरींत व कपड्यांच्या छानछोकींत असतं, का अन्तःकरणांत असतें? हो, नाही तर आमचे खेड्यां-तील सगळेच संसार दुःखी म्हणावे लागतील!'

'अहो ही नवीन 'थिअरी' आहे.'

'ती तुमची 'थेर' तुम्हालाच लखलाभो. उद्या आपला येथून मुक्काम हालवावा एवढं खरं!'

---

# पूज्य बुद्धीचे ज्योतिषी !

फलज्योतिष हें मृगजळ म्हणतांना ? मग कांहो त्याच्या पाठीमागे लागतां ? असा प्रश्न विचारायचा अगदी ओठावर येतो. कारण उत्कर्षाच्या शिखरावर आरूढ केव्हां होईन म्हणा अगर सौख्याची अमावास्या झाली असतांना म्हणा, पोटाला केव्हां लागेन म्हणून म्हणा अगर पोटदुखी केव्हां थांबेल म्हणून म्हणा,संसाराच्या उंबरठ्यावर उभें राहाण्यापूर्वीं म्हणा, अगर 'ती' माझ्या अगोदर डोळे मिटील का नाही म्हणून म्हणा, मुलें कर्तबगार निघतील का नाही, अगर नशिबीं मुलगा आहेच का नाही ? बायको रूपानें सुंदर, का गुणानें सुंदर, का पिठोरी अमावास्याच असेल ? 'डिग्री'चा कुंकुमतिलक लागल्यावर आयुष्याला वळण लागेल का बेकारीमुळें बरगड्या दिसतील ? अशा जिज्ञासेनें—सारांश, आयुष्याचा नकाशा अशा चित्र-विचित्र ठिकाणांनीं आखलेला असतो कीं त्यावरून प्रवास करतांना एखादे वेळीं तरी ग्रहांच्या वेळापत्रकाचा सल्ला घेण्याचा प्रसंग येतोच येतो. आणि तो सल्ला देण्याचें काम करणारांना ज्योतिषी म्हणतात.

ज्योतिषी ! ज्योतिषी म्हटला कीं तीं कानांतील कुंडलें, तो दोन भिवयां-मधील शेंदूर, तो मनगटावरील मंतरलेला ताईत, ती बोटांतील नीळाची अगर पुष्कराजाची अंगठी, तें जिव्हेवरील विदूषकी नृत्य, तें एखाद्या रँग्लरप्रमाणें तोंडानें पटापट केलेलें ग्रहांचें गणित, ते विमाकंपनीच्या चार्ट-प्रमाणें निरनिराळ्या कामांचे फीचे आंकडे, तें गिऱ्हाइकाला हरभऱ्याच्या झाडावर चढवणें, तीं कुंडल्यांचीं बाडें, ते त्याचे स्वतःस न कळणारे, पण गिऱ्हाइकाच्या देखत मध्येच उघडून पाहण्याचा बहाणा करण्यासाठीं सज्ज राखलेले बृहत् पाराशरी, सारावली वगैरे संस्कृत ग्रंथ, एकदम डोळ्यांपुढें दिसूं लागतात ! याच्या धंद्याचें मुख्य भांडवल म्हणजे आकाशांतील अकरा ग्रह. या अकरा ग्रहांप्रमाणेंच यानें केलेलें माणसाच्या हयातीचें भविष्य त्याच्या हयातीपर्यंत आकाशांतच फिरत असतें. त्या ग्रहांप्रमाणेंच

त्या भविष्याचे पायहि भू-लोकावर कधींहि लागत नाहींत ! कदाचित् मनुष्याच्या मृत्यूनंतर देवयान पथावर त्यांची गाठ पडत असल्यास न कळे ! एखादा आंग्लवैद्य शुश्लरने शोधून काढलेल्या द्वादश क्षारांवरून माणसाच्या सर्व रोगांवर औषध देतो. तद्वत् ज्योतिषीहि पत्रिकेंतील बारा राशींच्या साहाय्यानें मनुष्याच्या आयुष्यांतील सर्व प्रश्नांचा उलगडा करतो !

पत्रिका ! पत्रिका पाहिली कीं अनेक कल्पनातरंग माझ्या मनामध्यें उठूं लागतात. पत्रिकेला मानवी आयुष्याची दोरी लावून परमेश्वर हा पतंगाचा खेळ खेळत नसेल ना ? आणि त्या खेळांत उडालेली दु:खाची धूळ माणसाच्या डोळ्यांना झोंबत नसेल ना ? दैवाचा अनुकूल वारा वाहत असल्यामुळें कांहीं पतंग आकाशांत उंच उंच भराऱ्या मारतात. तर प्रतिकूल परिस्थितीमुळें बहुतेक सारे पतंग जागच्या जागींच थबकतात ! उलट कांहींच्या आयुष्याच्या दोऱ्या कुचक्या असल्यामुळें उंच भराऱ्या मारीत असतांना ते मध्येंच तुटून पडतात !

आकाशांतील ग्रह जरी निरनिराळ्या रंगांचे व आकारांचे असले तरी पत्रिकेंतील सारे ग्रह एकाच रंगाचे व आकाराचे असतात. आकाशांतील ग्रहांना निरनिराळी गति असली तरी पत्रिकेंतील ग्रहांची गति कुंठितच झालेली असते. कारण माणसाच्या जन्मकालापासून पत्रिकेंतील सारे ग्रह एकाच जागेवर बसून असतात. त्यामुळें त्यांच्या पायांना मुंग्यासुद्धां येत असतील ! आकाशांतील ग्रह अनादि कालापासून फिरत असले तरी पत्रिकेंतील सारे ग्रह घरें बांधून राहिलेले असतात. शनि, गुरु, बुधादि ग्रहांचीं तर दोन दोन गृहें आहेत. त्यावरून ग्रहसुद्धा भांडवलशाहीचे पुरस्कर्ते असावेत असें वाटतें ! प्रत्येक ग्रहाची सप्तम स्थानावर पूर्ण व इतर निरनिराळ्या स्थानांवर कधी पूर्ण, तर कधी गणपतीप्रमाणें किलकिली, तर कधी डोळे मिटवल्याचा बहाणा केलेली दृष्टि असते. या पत्रिकेंतील ग्रहांना एकमेकांकडे टिवल्या बावल्या करीत पाहण्याखेरीज दुसरा उद्योगच नाहीं कीं काय ?

आणि पत्रिकेंत स्त्रीग्रह असल्यामुळें माझा संशय तर जास्तच दुणावतो ! पत्रिकेंतील कांहीं ग्रह अग्निराशींत असले तरी पत्रिका कधी होरपळत नाहीं, जलराशींत असल्यामुळें ती कधी भिजत नाहीं, वायुराशींत असल्यामुळें उडत नाहीं, कीं चर राशींत असल्यामुळें कधी चालत नाहीं. मात्र पृथ्वी राशींत असल्यामुळें ग्रह जागच्या जागेवर बसून असतात- 'दैवमेवात्र पंचमम्' हेंच खरें !

संसार असार आहे म्हणून साधुसंतांनीं कितीहि कळवळून सांगितलें तरी कोणी संसारांतून उठला आहे का ? फलज्योतिष 'सव् झूट आहे,' त्यांत कांहीं अर्थ नाही असें पिढयान् पिढया लोक सांगत आले तरी फलज्योतिष पाहण्याचे आनुवंशिक संस्कार कोणाला सुटले आहेत ? आणि हें म्हणणें खोटें म्हणावें तर मूल जन्मल्यावर त्याची पत्रिका करण्याचें प्रयोजनच काय मुळी ? रावणानें सीतेला हरण केली तेव्हां प्रभु रामचंद्रांनी सुद्धा 'तिचा वियोग कधीं संपेल ?' म्हणून ज्योतिष्यास प्रश्न विचारण्यास कमी केलें नाहीं. मग तुमची आमची काय कथा !

पुणें हें विद्येचें माहेर घर आहे. तेव्हां अनेक सुप्रसिद्ध ज्योतिषी लांब-लांबून न आले तरच नवल ! येथें येणाऱ्या ज्योतिष्यांचा मुक्काम जाहिरातींत जरी आठच दिवस छापलेला असला तरी ते चांगले चार चार महिने तळ देऊन राहतात. कारण ज्या वाड्यांत ते खोली घेऊन राहतात त्या मालकाच्या घरांतील सर्व मंडळींचें भविष्य पाहिल्यामुळें ज्योतिषी-बोवांस घरभाडें व चहा फुकट मिळतो. ज्या खानावळींत ते जेवावयास जातात तिच्या मालकांची कुंडली पाहून 'चार महिन्यांनी मेंबरांची वाढ बेसुमार होणार, व दहा वर्षांनी तुम्हाला एवढा पैसा मिळेल कीं तुम्ही मला ओळखणार सुद्धा नाहीं' असें सांगून त्यास चढविल्यामुळें तो खूष न झाला तरच आश्चर्य ! शिवाय खानावळीच्या ऑफिसरूममध्यें त्यांनी आपली पाटी लावून ठेवली असल्यामुळे अनायासें तेथेंहि त्यांना भरपूर

गिऱ्हाईक मिळे आणि विशेषतः वरसंशोधनार्थ बाहेर गांवाहून आलेले मुलींचे बाप खानावळींत पाहुणे म्हणून जेवावयास येत, तेव्हां तर मालकां-पेक्षाहि यांचाच हात जास्त ओला होई ! नाटक कंपनीच्या मालकास कोणतें नाटक कोणत्या वारीं लावलें असतां विशेष फायदा होईल हा सल्ला प्रश्न कुंडलीच्या आधारें ते देत असल्यामुळें नाटकाच्या दिवशीं नाटक-गृहांत त्यांना मानाचें स्थान मिळे. या अपूर्व कामगिरीबद्दल त्यांना भरपूर मोबदला मिळे. अशा रीतीनें वसतिगृह, अन्नपूर्णागृह व नाटकगृह यांच्या-वर आपल्या ग्रहांची पूर्ण छाप बसवल्यामुळें ज्योतिषीबोवांचा मुक्काम न वाढला तरच नवल !

अर्थात् या चार महिन्यांत त्यांच्या ज्ञानाची अवास्तव स्तुतीहि त्यांच्या पगारी हस्तकांतर्फे ऐकूं यावयाची. ' आज तीस वर्षांचा त्यांचा व्यासंग आहे. हजारों कुंडल्या त्यांच्या डोळ्यांखालून गेल्या आहेत. ते मनांतील प्रश्न जाणतात. एका गृहस्थाच्या कुंडलीवरून त्यांच्या कुटुंबाला किती दिवस गेले हें त्यांनीं बिनचूक सांगितलें. फार काय, एकाच्या चष्म्याचा नंबर किती आहे हें सुद्धा त्यांनीं सांगितलें ! त्यांचीं सर्व भविष्यें तंतोतंत बरोबर जुळतात. तात्पर्य, परदेशांतील अत्यंत नाणावलेले डॉक्टर रोग्याच्या नुसत्या श्वासोच्छ्वासावरून त्याचा रोग सांगतात, त्याप्रमाणें हेहि नुसत्या चेहऱ्यावरून खाड खाड प्रश्न सांगतात. ' अशी स्तुति ऐकल्यावर ज्यांची या शास्त्रांत थोडीशी गति आहे तेहि त्यांना भेटावयास जाणार हें उघड आहे. अशा नामवंत ज्योतिष्यांच्या प्रत्यक्ष भेटींत व पत्रव्यवहारद्वारें झालेल्या ज्ञानाचा फायदा वाचकांसहि मिळावा म्हणून मी स्वतःच कांहीं अनुभव खालीं देत आहें.

( १ ) मी कॉलेजामध्यें पहिल्या वर्षांत असतांना अशाच एका ज्योतिष्या-कडून दोन रुपये देऊन वर्ष-भविष्य करून घेतलें होतें. त्या वर्षभविष्यांत खालील ठराविक शब्द आलटून पालटून प्रत्येक महिन्याखालीं दिले होते !

सांसारिक सुख, स्त्रीस क्लेश, कुटुंबाशीं भांडणाचे प्रसंग, विवेक धरा, स्त्रीलाभ, पुत्रप्राप्तीचा संभव, विशेषत: मार्च, जून व ऑक्टोबर हे महिने जास्त अनुकूल; कोणत्याहि कार्यात धडाडीनें पुढें याल, जमीन खरेदी-विक्री करण्यास काल अनुकूल, कोर्टदरबारीं यश, अचानक लाभयोग, लॉटरीचें तिकिट अवश्य काढा, संततीसुख, गुप्त शत्रूंचा सुळसुळाट, स्वजनांशीं विरोध, कुटुंबाच्या प्रकृतीस संभाळा, अन्नलाभ, वस्त्रचिंता, ता. १।३।६।१४।२७ चांगल्या. ता. २।७।१७।२३।२९ वाईट. बाकीच्या मध्यम.

टीप—पत्राप्रमाणें त्रोटक वर्षफल पाठविलें आहे. सूक्ष्म व विस्तृत फलादेशांनी युक्त असें वर्षफल पाहिजे असल्यास १० रु. पाठवावे. एक वेळ जरूर अनुभव घ्या.

—राजज्योतिषी.

वर्ष-भविष्य वाचल्यावर मी खालील आशयाचें एक नॉटपेड पाकीट त्यांस पाठवलें.

...वर्ष-भविष्य वाचलें. या शास्त्रावरील आपला व्यासंग पाहून तोंडांत बोटच घातलें. आपणासारखा ज्योतिषी सबंध हिंदुस्थानभर शोधून मिळणार नाही. आपण फार गुणी आहां. काम फारच काळजीपूर्वक करतां. आपल्या शहाणपणाची तारीफ करावी तेवढी थोडीच. खरोखर आपल्यासारखीं रत्नें आज हयात आहेत म्हणून हिंदुस्थानाला हे दिवस आले आहेत. शरिराला जसें हृदय, तसें हल्लीं दैनिकाला भविष्यकथन. तें नसेल तर वर्तमानपत्र हटकून बंद पडण्याचीच भीति ! आपण ज्या दैनिकाचें हृदय आहां, त्याच्याच संपादकाकडे आपल्या भविष्यकथनाचा उत्कृष्ट नमुना म्हणून मी माझें वर्षभविष्य पाठवून स्वतःचे पैसे देऊन छापवणार आहें. त्यामुळे आपणाकडे येणाऱ्या गिऱ्हाइकांचाहि फायदा होऊन आपल्या द्रव्यप्राप्तीच्या ओघाला निराळें

वळण लागेल. ज्योतिषिबुवा ! मी कॉलेजमध्यें शिकत असतों. माझें वय सारें अठरा आहे. या वयाला हल्लीं मुलींचीं सुद्धां लग्नें होत नाहींत. आपण माझा जन्मशक सुद्धां पाहण्याची तसदी घेतलेली दिसत नाही. पण चुकलोंच मी. आपण कुंडलीच कशाला पाहिली असेल म्हणा ? नुसत्या राशीवरून चार आण्यांचें पंचांग पाहून त्यांतील दरवर्षाचेंच ठराविक वर्णन नुसतें लिहिण्याची तुम्ही तसदी घेतलेली दिसते. पैसे परत पाठवल्यास फार आभारी होईन. कळावें, लोभ नसावा हें विनंति.

( २ ) तो दुसरा प्रसंग मी कधीहि विसरणार नाहीं. ' आपले पांच प्रश्न एका कागदावर लिहून पाकीट सीलबंद करून पाठवा. पाकीट न फोडतां आपल्या प्रश्नांचीं उत्तरें बिनचूक पाठवूं. सोबत पांच रु. ची मनीऑर्डरहि पाठवावी. ' अशा आशयाची ती वर्तमानपत्रांत आलेली जाहिरात मी मित्रमंडळींना वाचून दाखवली. साहजिकच त्या ज्योतिष्या-बद्दल आम्हां सर्वांना कुतूहल उत्पन्न झालें. त्या दिवशीं गंधर्वांच्या नाटकाला जाण्याचें आम्हीं रहित करून ते पैसे इकडे खर्च करण्याचें ठरविलें. प्रत्येकानें आपला एक एक प्रश्न लिहावयाचा असा पहिल्यानें बेत ठरला. पण कदाचित् त्या पाकिटाचा तो ज्योतिषी ' एक्स रे ' काढील अशी शंका मी प्रदर्शित केल्यामुळें हाहि बेत फिसकटला. हे पैसे गमतींतच घालवावयाचें ठरल्यामुळें मी नुसता कोरा कागद पाठविण्याची कल्पना सुचविली, अर्थात् ती सर्वांना पसंत पडली. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, आम्ही कोरा कागद पाकिटांत सीलबंद करून पाठवला तरी सुद्धां पांच प्रश्नांचीं उत्तरें आलीं !!!

( ३ ) हे पाहा तिसरे ज्योतिषी. यांच्या अतर्क्य ज्ञानाबद्दल त्यांची तारीफ करावी कां कींव करावी हेंच समजत नाही. तुमच्याजवळ जन्म-कुंडली नाहीना ? नसूं द्या. तुमची जन्मवेळ व जन्मतारीख तुम्हांस माहीत नाहीना ? कांहीं अडत नाही नसली तरी. तुम्हांला तुमच्या

आयुष्यांतील ठळक ठळक गोष्टी तर आठवतातना ? मग काय हो ! आणि मुख्यतः तुमचे दोन हात व चेहरा तर कोणी नेला नाहीना ? झालें तर ? मग चला खिशांत दहाची नोट घेऊन या सुप्रसिद्ध ज्योतिष्याकडे. कां दवडतां असली अमूल्य संधि ? ते हां हां म्हणतां तुमची कुंडली करून देतील व त्यांच्या मतें शंभर टक्के जुळणाऱ्या (?) भविष्यज्ञानाचा फायदाहि तुम्हांस करून देतील. वरील उद्गार मी लखोबाजवळ काढले मात्र. लगेच फेटा बांधून त्यांनी मला बरोबर येण्याची विनंति केली. माझी एका पायावर जायची तयारी होतीच ! कारण हें काय गौडबंगाल आहे हें मला एकदां पाहावयाचेंच होतें. पण अवघा तीस रुपये पगार मिळणाऱ्या लखोबांचे दहा रुपये पाण्यांत घालण्याची माझी इच्छा नव्हती. मी म्हटलें, ' हे पाहा लखोबा, माझी कुंडली अगदीं बरोबर आहे. तेव्हां माझीच कुंडली करायची आहे असें ज्योतिष्यास सांगूं. मग त्यानें केलेली कुंडली व माझी खरी कुंडली जर बरोबर ठरली तरच तुमची करूं. आणि जर चुकली तर ज्योतिष्याची चांगलीच शोभा होईल ! ' लखोबांनी मला टाळी दिली.

आम्ही ज्योतिषिबोवांकडे गेलों तेव्हां कोणाचें तरी हयातीचें भविष्य लिहिण्यांत ते गुंग झाले होते. माझी कुंडली तयार करावयाची आहे म्हणून मी त्यांस सांगितलें. ' तुमच्याजवळ कुंडली खरोखरी नाहींना ' म्हणून त्यांनीं दहा वेळां माझ्याकडून वदवून घेतलें. मग शेजारच्या हॉटेलांतील तीन सिंगल मागवून ते खुर्चीत काम करावयाला पुढें सरसावले. त्यांनी मला भाऊ किती, बहिणी किती, वडील काय करतात, आई हयात आहे किंवा नाहीं, शिक्षण किती झालें, कला कोणती येते, आजारी केव्हां केव्हां पडलां वगैरे नवऱ्या मुलीला जसे प्रश्न विचारतात तसे प्रश्न विचारले. मग त्यांनीं माझे दोनहि हात पाहिले. अंगठ्यावर यव आहे कां रेघ आहे हें पाहिलें. कानाच्या पाळया सुटया कीं चिकटल्या

आहेत हेंहि निरखिलें. आणि मग कागदावर कुंडली मांडून दिली. मग सिगारेट पेटवीत व एक लखोबांना देत ते म्हणाले ' ही पाहा हस्तसामुद्रिकाधारें व मागील हकीकतीवरून तुमची कुंडली अगदी बरोबर करून दिली आहे. प्रत्यक्ष महाडकर* ज्योतिषी स्वर्गांतून जरी खालीं उतरले तरी ते सुद्धां सांगतील कीं, कुंडली बरोबर आहे. शेंकडों लोकांच्या कुंडल्या मी केल्या आहेत. हयातीचें भविष्य पाहिजे असल्यासहि लगेच करून देतों. ' महाडकर ज्योतिषी स्वर्गांतून न उतरतां हळूहळू माझ्या कोटांतून उतरूं लागले ! खिशांतून काढलेली कुंडली व ही नवी कुंडली मी पाहूं लागलों तों मला हसूंच कोसळलें; इतका त्यामध्यें फरक. लग्न, रास, ग्रह सर्वच उलटे सुलटे ! ज्योतिष्याची शुभ दृष्टि एकदम अशुभ झाली. ' येथें काय माझी टिंगल करावयाला आलां आहांत काय ? ' म्हणून ते एकदम आमच्या अंगावर खेकसले. मी शांतपणें त्यांस खरी हकीकत सांगितली. तेव्हां तेहि ओशाळले. तात्पर्य, ज्योतिष्यांच्या असल्या भपकेबाज जाहिरातींना किती तरी लोक फसतात आणि वेडयावांकडया पत्रिका करून घेऊन आपल्याला साडेसाती आहे, हें वर्ष अनुकूल नाही तेव्हां धाडस करून उपयोगी नाहीं म्हणून आलेली सुवर्णसंधि दवडतात व हातपाय गाळून बसतात. रेसमध्यें व लॉटरीमध्यें पैसा मिळेल या ज्योतिष्यानें लावलेल्या नसत्या आशेला बळी पडतात. आणि वेडयासारखी जवळची गंगाजळी खलास करून नेत्रांत भरपूर गंगाजळी साठवतात !

( ४ ) आतां ज्ञानेश्वरींतील कळसाध्यायाप्रमाणें माझ्या शेवटच्या अनुभवाचा कळस पाहा. या खेपेला मी दोन चार मित्रमंडळींसह अशाच एका नांवाजलेल्या ज्योतिष्याकडे गेलों होतों. पण आमची नेहमी व्यवहारदृष्टि. कोणतेंहि नाणें खरें आहे किंवा नाहीं हें पाहण्याची

* हे चेहऱ्यावरून पत्रिका बरोबर करीत असत असें म्हणतात.

माझी नेहमीची संवय. या खेपेला मी लोकमान्य टिळकांची कुंडली घेऊन गेलों व ती माझीच म्हणून त्यांस सांगितलें. कुंडलीखालीं ग्रहांचे अंश कां मांडले नाहींत म्हणून त्यांनी आम्हांस मुळींच विचारलें नाहीं. मात्र द्रव्यांशाबद्दल पहिल्यानें चौकशी केली ! कुंडली एकदां त्यांनीं निरखून पाहिली. त्यानंतर आम्हां दोघांमध्यें जीं प्रश्नोत्तरें झालीं तीं मोठीं ऐकण्या-सारखीं आहेत.

मी—शिक्षण किती ?

ज्यो.—या जातकाला शिक्षण पूर्ण दिसत नाहीं. अर्धवट मध्येंच सोडावें लागलें. कारण पंचमेश, चतुर्थांत पडला व त्याच्याशीं लग्नांतील रवि, शुक्र, केंद्रयोग करीत आहेत. फिरून त्याच्याशीं नवमांतील गुरु, चंद्र व राहू षडाष्टक करीत आहेत.

मी—ते काय करीत आहेत तें तुम्ही पाहा. काय होणार आहे तें मला सांगा. बरें, धंदा काय करावा ?

ज्यो.—तुम्हीं शाळाखात्यांत नोकरी धरा. तो धंदा तुम्हांला सोई-स्कर आहे.

मी—शेवटपर्यंत मास्तरकीच, कां कांहीं बदल ?

ज्यो.—छेः छेः ! नांव नको. तुमचा आपला धोपट मार्ग. हयात-भर पंतोजी एके पंतोजी !

मी—द्विभार्यायोग आहे का ?

ज्यो.—द्विभार्यायोग जरूर संभवतो. कारण सप्तमेश व्ययांत पडला. शिवाय तुम्हांला मंगळहि आहेच.

मी—धनयोग कसा काय आहे ?

ज्यो.—नवमांतील गुरु–चंद्र पोटापाण्याला तुम्हांला कधीं कमी पडूं द्यावयाचे नाहींत. दरमहा पन्नाससाठ रुपये मिळावयाला तुम्हांला मुळींच

मरण नाहीं. व्ययांतील शनि मात्र फार वाईट पडला आहे. तो तुम्हांला कर्जबाजारी करून कदाचित् तुरुंगांतहि बसवील. कांहीं नेम नाही.

मी—आयुष्यांत मानसन्मानाचे प्रसंग येतील का ?

ज्यो.—मास्तराच्या धंद्यांत कसले मानसन्मानाचे योग ? आतां रिटायर होतांना तुम्हांला पानसुपारी होईल, नाहीं असें नाहीं !

मी—ज्योतिषीबोवा, मी खरं सांगू, मला नेहमी वाटतें कीं, लोकांत पुढें यावं, नांव मिळवावं.

ज्यो.—तरुणपणीं सर्वांनाच असें वाटतें. पण पुढें जातील हे विचार.

मी—असें वाटतें की आपण मोठमोठीं व्याख्यानं द्यावीं, देशाचे पुढारी व्हावं.

ज्यो.—तर तर जेवणच आहे तें ! जो उठला तो पुढारी होऊं लागला तर अनुयायी व्हायचें कुणी ? काल सुभाषबाबूंच्या व्याख्यानाला गेलां होतांत वाटतें. तें वारें अजून तुमच्या डोक्यांत खेळत आहे !

मी—पण कांही लोक सांगतात की तुम्ही फार पुढे याल. तुमच्या नवमांतील गुरुचंद्र–युति अगदी असामान्य आहे. लोकमान्यांच्या पत्रिकेंतहि अशीच युति आहे.

ज्यो.—अहो, एका आचाऱ्याच्या कुंडलींत सुद्धां मी गु. चं. युति अगदीं अंशात्मक पाहिली होती. सर्वांनाच कांही त्याचें फळ मिळत नाही. अहो, हल्ली अन्नाने दिवस काढणें कठीण झालें आहे. शिवाय तुमच्या गु.चं युतीशीं शनि, बुधाचा केंद्रयोगहि झाला आहे. त्यामुळें निम्मे फळ गेलें.

मीं—तुमचा मी फार वेळ घेऊं इच्छित नाही. पण एखादा अलौकिक संस्मरणीय ग्रंथ तरी माझ्या हातून होईल का ?

ज्यो.—फिरून आपलें तेंच ! मी तुम्हाला खरं सांगू का ? तुमच्या मोठ्या आशा फोल आहेत. स्पष्टच सांगायचं तर तुमची कुंडलीच सामान्य आहे.

मी—मग स्पष्टच सांगायचें तर ही लोकमान्यांची कुंडली आहे !

ज्यो.—छत् खोटी गोष्ट. ही तुमचीच आहे.

मित्र—नाही हे म्हणतात तेंच खरं आहे.

ज्यो.—तरी मला वाटलंच कीं ही कोणातरी थोर पुरुषाची कुंडली आहे. गु. चं. युतीच तशी बेफाट आहे. अहो, हा राजयोग आहे. आणि लोकमान्य अनभिषिक्त राजे होतेच.

मी—मग तुम्हाला हें पहिल्यानें कां सांगतां आलें नाही ?

ज्यो—अहो, लोकमान्यांची गोष्ट वेगळी तुमची वेगळी.

मी—म्हणजे लोकमान्य काय कोणी संस्थानिक होते ? ते सुद्धां कोंकणांतील एका गरीब ब्राह्मण घराण्यांतच जन्माला आले होते; पण तुम्ही ग्रहांचें वर्णन मनुष्य पाहून करतां, म्हणून असे तोंडघशी पडतां !

---

# मी—म्हटलं मी !

या पुण्यांत काय उणं आहे ? कसं सर्वत्र सुधारणेचं वारं खेळत आहे. आम्ही स्त्रिया कोठेंहि गेलों तरी मुळी भीति नाहीं हो आतां. मी सकाळीं मंडईत जातें, दुपारीं कालेजांत जातें, फार काय संध्याकाळीं मित्राबरोबर फिरावयास सुद्धां जातें ! कोणी आम्हांला बोलत नाहीं. गर्दीमध्यें कोणाचा धक्का लागेल असें समजतांच बाजूला व्हा म्हणून मी सांगत असतें. आणि एवढंहि करून कोणी धटिंगण मला खेटून जाऊं लागले तर मीच आपली मुळीं बाजूला सरतें. हो मागून उगीच पंचाईत नको ! खरंच बाई, संध्याकाळीं एखाद वेळीं टांग्या मोटारींच्या गर्दीत मी सांपडलें तर माझे हातपाय कांपायला लागतात ! वाटतं याच्यांतून सुरक्षितपणं बाहेर पडलें म्हणजे मिळवली. एखादवेळीं बाहेरून घरीं यायला तीन्हीसांज झाली तर किती तारांबळ उडते म्हणून सांगू ? ' घरीं बोलतील म्हणून नव्हे हो ! तर वाटेंतील माणसं काय म्हणतील म्हणून ' मी झपझप पावलं टाकीत जातें. मी मनाशीं म्हणतें देखिल कीं ' मला नाहीं बाई वाटलं एवढा उशीर होईल म्हणून ! एक ना दोन—आतां काय त्याचं ! तरी बाबा मला म्हणत होते हो, कीं दिवाकराला बरोबर घेऊन जा. '

मी बाई आपली नवमतवादी आहे. मिश्रविवाह मी सांगून सवरून केला. हो लाज कशाला पाहिजे त्याची ? झालीं त्या गोष्टीला चांगलीं पंचवीस तीस वर्षें झालीं. काय त्यावेळीं लोकांत चर्चा नि कुजबुज. मी बाहेर पडलें, कीं सगळीजणं माझ्याकडे टकटक पाहात बसायचे. ' तिकडचं नि माझं प्रेम किती किती म्हणून सांगू ? आम्ही केव्हांहि बाहेर जातांना हातांत हात घालून जायचो ! आणखी किती समान हक्क हवेत ? पण आतां तर काय बाई कांहींसुद्धां धरबंध राहिला नाहीं. घरोघरीं मिश्रविवाह आतां व्हायला लागले आहेत ! कोणाला आश्चर्य वाटत नाहीं याचं आता ?

पण गेलीं दोन–चार वर्षे पाहतें आहे मी, कांहीं जणी आपल्या बंधना–पलीकडे जात आहेत. पुरुषांची ताबेदारी नको म्हणून त्या पुरुषांच्या वाऱ्याला सुद्धां उभ्या राहात नाहींत. सदा सर्वकाळ आपल्याच मैत्रिणींच्या सान्निध्यांत. या मैत्रिणी रस्त्यांतून जाऊं लागल्या कीं कांहीं बायका नाकं मुरडतात. कांहीं रंगेल थेरडे तर मागं वळवळून, वळवळून पाहतात. कांहीं गुलहौशी तरुण तर गालांतल्या गालांत खुदकन् हसतात. फार काय, कांहीं छाकटे टारगे त्यांचा पाठलागसुद्धां करतात. तरीसुद्धां या ज्वालांच्या वलयांतून त्या सुखरूप घरीं येतात हो! मी सुधारणाप्रिय असल्यामुळें या मुलींचा धीटपणा पाहून मला कौतुक वाटतं त्यांचं. मूठभर मांस चढतं मला त्यांना पाहून. एवढी ही सुधारणाप्रिय कोण म्हणाल, तर मीं–म्हटलं मी! सायकल हो!

---

# आजारांतील वैभव

संध्याकाळची वेळ खरी फिरायला जाण्याची. पण आज बरेच दिवसांत मला लिहिण्याचीच लहर आली. माझे मित्र लखोबा मला फिरावयास निघण्यासाठीं हाक मारूं लागले. पण मी लिहिण्याच्या ऐन रंगांत असल्या-मुळें त्यांस बळेंच ' ओ ' दिली नाही. पण लखोबा पडले खप्पी. त्यांना वाटलें ' मी चोरून चहा पीत असेन ' म्हणून पाय न वाजवितां हलकेच ते माडीवर माझ्या खोलींत आले.

माझ्या लेखाचें शीर्षक पाहून भिवया चढवून मला ते म्हणाले, ' गंमत आहे बोवॉं मोठी तुमच्या विषयाची ! काय म्हणे आजारांतील वैभव ! अहो आजारांत गंमत असती, आनंद असता, मोठेपणाचा दिमाख असता, तर ' शरीरमाद्यं खलु धर्म साधनम् ' हें सुभाषित प्रचारांतच आलें नसतें. मी म्हणालों, 'अहो सगळें खरें. तुमचें सुभाषित जसें खरें, तसें आजार हा सुद्धां सर्व 'खुळांचे' साधन आहे—हेंहि खरें.' मी म्हणतों याची तुम्हाला प्रचीति पहावयाची आहे का ? मग आज संध्याकाळीं घरीं गेल्यावर मधून मधून खोटेंच खोकायला लागा पाहूं ! लगेच तुमची लाडकी कावरीबावरी होऊन म्हणते का नाही बघा ! ' बाई खोकायला काय झालं आज ? तेलकट तळकट आंबटचिंबट कांहीसुद्धां आज खायचं नाही, नि उगीचच्या उगीच कसा खोकला आला ? खडीसाखर देऊं का तोंडांत धरायला ? ' काय, होत आहेत कीं नाहींत मनांतून गुदगुल्या ? किती प्रेमळ शब्द ! खडीसाखरेहून गोड का अमृताहून गोड तुम्हीच ठरवा. आणि रात्रीं निजतांना दहा वाजतां तांब्याभांड्याऐवजीं चहाचा कप आणलेला पाहून तुम्ही आश्चर्यानें म्हणाल ' हें काय आत्ता कशाला चहा ? हल्ली मला लवकर झुलकी लागते म्हणून चहा देऊन जागें ठेवायचं आहे वाटतं मनांत ! ' तोंच ' पुरे झाली

ती चेष्टा. दोन मुलं झालीं तरी अजून आपला यांचा रोमान्स ! जसं कांही कालच लग्न झालं आहे. हं उठा लवकर. ती थोडी हळद घ्या नि वर घुटका घ्या दुधाचा. कढत कढत दूध घ्या अंमळ. म्हणजे रात्रीं खोकल्याची उबळ नाही यायची !' हें पत्नीचें उत्तर आलेंच म्हणून समजा. नुसतें आजाराचें निमित्त. पण किती गंमत उडते त्याने ! पण ही खोकल्याची गोळी सर्वांनाच नाही लागू पडायची. ज्यांना दमा खोकला नेहमीचाच त्यांच्या घरांत खोकला हा खिजगणतींतहि नसतो. घरांतल्या दहा माणसां-प्रमाणेंच तो एक अकरावा. इतका तो घरोब्यांतला. बायका बायका बसल्या असतांना पहावी गंमत. त्यावेळीं जरा कानोसा घेतलात तर खालील वाक्यें तुमच्या कानावर पडतात का नाही बघा ! ' बाई तुम्हाला झोप तरी कशी येते, सारखे रात्रीं खोकत असतात ना.' ' तुमच्या ' इकडे ' चोवीस तास नाकाचं धुराडं केलेलं असतं ! कशी झोप येते तुम्हाला राम जाणे. आम्हाला तर बाई मळमळून येईल.' ' आणि आमच्या सारख्या बायका तिसराच संशय घेतील.' ' अहो कांही नाही, आपोआप अंगवळणी पडतें.' ' आतां कसं बोलल्यात.'

आतां माझीच गोष्ट घ्याना. बायको माहेरीं गेल्यामुळें कांही काळ अंतरते. मित्र बाहेरगांवीं गेले किंवा मध्येच त्यांची खप्पा मर्जी झाली तर ते रोज भेटूं शकत नाहींत. पण खोकला कधीं आला नाहीं असा दिवस मला आठवून आठवत नाहीं. तेव्हां हा माझा किती जिवश्च कंठश्च मित्र असेल याची कल्पना करा. किती याचें माझ्यावर अलोट प्रेम ! मला झोप लागली तरीसुद्धां हा मधून मधून उठून आमच्या वाड्याला गस्त घालीत असतो.

त्यामुळें आमच्या वाड्याला भय्या ठेवण्याची कधींच गरज भासली नाही. कारण आमच्या वाड्यांत चोरी अशी कधीं झालीच नाही. तेव्हां जो माझ्या आणि इतर बिऱ्हाडकरूंच्या मालमत्तेला निःस्वार्थबुद्धीनें जपतो त्याच्या परोपकाराची थोरवी काय वर्णन करावी ? आणि उद्यां हिंदुस्थानचा

रशिया झाला तर माझ्या व लोकांच्या मालमत्तेला जपणाऱ्या ह्या स्वारीला भाई लोक पहिल्यानें फाशी देतील अशी मला भीति वाटते !

या माझ्या मित्राला जरा विश्रान्ति मिळावी म्हणून मी थोडी का याता-यात करतों ? मी रोज खदखदा हसतो. पण कढईत खदखदा हसणाऱ्या भजांना मी हसून दूर लोटतों. अळवाच्या भाजींतील भुईमुगाचे दाणेसुद्धां मी बाजूला सारतों. मागच्या भातावर पानांत दह्याच्या कवडया वाढतांना पाहून, कुणाला खायचा मोह होणार नाही ? पण या मोहाला सुद्धां मी बळी पडत नाही. हे मी शरिराचे चोंचले करतांना पाहून माझी आई एखादे वेळीं म्हणे ' कांही नाही हा तुझा आपला भावनेचा खेळ आहे. तूं आपला खात जा, निदान वासना फजित तरी खावं, आणि आलाच खोकला तर खोक अंमळ जास्त.' आणि खरोखर आईची भीड कोणाला मोडवेल ? प्रेमळ मातेच्या आग्रहाबरोबर इतर मंडळींच्या हास्याच्या सरीहि मला आग्रह करीत असतात. आणि त्या सरींत माझी जिव्हाहि ओली चिंब होत असते.'

मी हा पैठणी आग्रह करून घेण्यांतसुद्धां मोठें राजकारण साठवलें आहे. कारण माझी प्रकृति म्हणजे निव्वळ कॉंग्रेसचा जातीय निर्णय. मान्यहि नाही, अमान्यहि नाही. प्रकृति चांगलीहि नाही, नि वाईटहि नाही. जातीय निर्णयानें अखिल राष्ट्रांत मोठी खळबळ उडवून दिली. आमच्या कौटुंबिक राष्ट्रांतहि माझ्या प्रकृतीनें मोठी खळबळ उडवून दिली. आणि योगायोग असा विचित्र, जातीय निर्णय हिंदुस्थानच्या ज्यावेळीं बोकांडी बसला त्याचवेळीं रोगानें माझ्या शरिरांत प्रवेश केला. तत्पूर्वी हिरवा ढेकर कसा तो मला माहीत नव्हता. कारण हिंदुस्थानप्रमाणें माझी सुद्धां मकर रास ! जातीय निर्णयानें कांही विशिष्ट प्रान्तांचें जास्त नुकसान झालें आहे. आमच्या कुटुंबांतहि फक्त माझ्या ' कुटुंबाचे ' तोंडचे पाणी शर्यतीच्या घोड्याप्रमाणें पळूं लागलें आहे. आणि त्याचा इतिहासहि मोठा मनोरंजक आहे.

लग्नापूर्वी आगगाडींतील उतारूंप्रमाणेंच तिची व माझी ओळख होती. पण कांहीं बोलके उतारू गाडींत बसल्याबरोबर ‘ तुम्हांला कोठे जायचें ? ’ म्हणून सूतोउवाच करतात. थोडया वेळानें सिगारेटचा अगर तपकिरीचा एकमेकांना अहेर करतात. मध्येंच एखाद्या चांगल्याशा स्टेशनवर चहा-पाणी करतात. आणि गप्पागोष्टी करीत शेवटपर्यंत आनंदांत प्रवास कर-तात. अगदी हुबेहूब तशीच माझी स्थिति आहे. संसाराची मी भाजीं व चटणी करीत नसल्यामुळें त्यांत मिठाचा खडा पडणार कसा ? उलट संसाराचें सरबत करणारा मी ! तेव्हां त्यांत साखरेचा खडा पडणार हें उघड आहे.

मैत्री ही दुपारच्या सावलीप्रमाणें केली, कीं आनंदाचें चांदणे सदैव अनुभवावयाला मिळतें. लग्न झाल्यावर वर्षांतले बहुतेक दिवस आम्ही एक-मेकांपासून दूरच होतों. पण दर आठवडयाला डाकवाला आमची भेट करीतच असे. प्रत्येक पत्राच्या शेवटीं ता. क. हा आपला ठरलेलाच ! त्याच्याशिवाय पत्राची गोडी केव्हांहि कमीच. प्रत्येक पत्राचे शेवटीं ताज्या कलमाचें ‘ ताक ’ मी पीत असल्यामुळें रात्रीं जागरण झालें तरी माझें अन्नपचन चांगलें होत असे.

पण आतां मी बिऱ्हाड केल्यामुळें ताकाचा रतीब आपोआपच बंद झाला. आतां आमचें दोघांचेंच राज्य ! आणि राज्यावर संकट आलें नाहीं तर तें राज्य कसलें ? तेव्हां लटकें कां होईना पण संकट हें आलेंच पाहिजे. माझ्या विनोदी स्वभावानें एक दिवस उचल खाल्ली. मी नेहमीप्रमाणें बाहेरून फिरून घरीं आलों तों थंडीनें सर्वांगभर कांपरें भरलें. दात–ओठ हालायला लागले, नि मी कोट घालून तसाच निजलों. अंगावर रग घेतला, घोंगडी पासोडी घेतली; फार काय तिची गादीसुद्धां अंगावर घेतली ! पण थंडी म्हणून कांहीं थांबेना. माझी ही अवस्था पाहून तिची जी घाबरगुंडी उडाली ती कांही विचारूं नका. कारण माझी

बडबड सारखी सुरू झाली. मला बरेच दिवसांत पाचारण आलें नव्हतें, आज आलें. माझें सगळें अंग ठणकत आहे. अंग चेप! अग जोरानं चेप!! दुपारीं जेवली आहेस का नाहीस? नक्की इन्फ्लूएन्झा होणार मला! गावांत साथच आहे. आणि इन्फ्लूएन्झा झाल्यावर न्यूमोनिया व्हायला किती उशीर? कां टायफॉईडच होतो कुणास ठाऊक? हल्ली नळाचें पाणीहि गढूळ येतें. अन् मग तुझें कसें होणार? मी विमामुद्धां उतरला नाहीं! 'पुरे झालं बाई अभद्र बोलणं. नाहीं बोलूं नये, पण हा तुमचा चहा बरं! तुम्ही रोज पीत जा आणखी हाटेलांत चहा. आणि आला एक दिवस ताप म्हणून एवढं का घाबरायचं? अंमळ धीर नको का धरायला? थांबा, तापनळी लावून पाहातें किती ताप आला आहे तें.'

मी मनांतल्या मनांत हसतच होतों. 'कांही नको तापनळी लावायला.' मी म्हणालों.

'नको कशी? जास्त कमी ताप असला तर डॉक्टरला नको का बोलवायला?'

'बरं बाई लाव तुझा आग्रहच आहे तर.'

'(तापनळी पाहात) ओहोहो! काय ताप! नाही. नाही पाहिलात का ९७·४ आहे!! कोणी म्हणेल यांना १०५ ताप आहे!!!'

'अग नीट लागला नसेल.' मी हसत म्हणालो.

'लावा, पुन्हा लावा, शंभर वेळां लावा. नाहीच ताप तर येणार कसा? म्हटलं सोंग छान घेतां येतं. नाटक कंपनींत पोट भरायला कांही मरण नाही.'

'अग पण हल्लीं नाटक कंपन्याच मरायला टेकल्या आहेत. चल ऊठ, पान वाढ लवकर. भूक फार लागली आहे आज.'

पण या नकलेनंतर चारच दिवसांनी माझ्या घरीं एक पाहुणे येऊन ठेपले. माझ्या घरीं बऱ्याच दिवसांनी हे पाहुणे आले म्हणून मीहि

पहिल्या दिवशीं त्यांचें थाटानें स्वागत केलें. मीं रोज शीतोदकाने स्नान करणारा, पण या महाराजांबरोबर मीहि आज कढत पाण्यानें स्नान केलें ! आज पाहुण्यांच्या पंक्तीचा अलभ्य लाभ ! पण उगीच डामडौल कशाला ? म्हणून भोजनाचा बेत अगदी साधाच ठेवला. जेवण झाल्यावर माझ्याबरोबर त्यांनाहि कचेरींत नेलें. कचेरींत मी रोज दुपारीं एकदां चहा घेतों. पण आज यांची तब्बेत राखण्यासाठीं दोनदा चहा घेतला ! संध्याकाळीं मजबरोबर त्यांनाहि फिरावयास नेलें. मित्रांशी यांची ओळख करून दिली व उद्या हे जाणार आहेत म्हणूनहि सांगितलें. पुण्याची हवा थंड ! त्यांतून हा असा पाऊस. चिखलापाण्यांतून पाहुणे मजबरोबर हिंडलेले. म्हणून रात्रीं मजबरोबर त्यांसहि पाती चहा दिला !

पण दुसऱ्या दिवशीं पाहातों तों स्वारीचा जाण्याचा बेत दिसेना. म्हणून मीहि तुसडेपणानें वागण्याचें ठरविलें. आज मी त्यांना आंघोळीला कढत पाणी दिलें नाही. फार काय पण मीहि पारोसा राहिलो, नि त्यांनाहि पारोसें ठेविलें ! बायकोवरहि चरफडावयाला मी सुरुवात केली. ‘ आज मला फक्त मेतकूट–भातच कर, पोळीबिळी कांही नको ’ म्हणून तिला स्पष्ट बजाविलें. तिच्याहि मनांतून या स्वारीनें लवकर काळें करावें असें होतेंच. म्हणून तिनें माझी आज्ञा तंतोतंत पाळली. जेवायला बसल्यावर मी बळानें फक्त चार घांस खाल्ले नि अर्धपोटीच उठलों ! अर्थात् माझ्याबरोबर त्यांनाहि उठावें लागलें; एवढेच नव्हे, तर ते ‘ नको नको ’ म्हणत असतां एका बाटलींतील विलायती पाणी मुद्दाम मी त्यांस तीन वेळां दिलें. माझ्या आजच्या अशा पाहुणचारावरून ही स्वारी आज संध्याकाळीं नक्की गाशा गुंडाळणार असें मला वाटलें. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, तीन दिवस झाले, चार दिवस झाले तरी पाहुणा घरांतून हालेना व मलाहि कचेरींत जाऊं देईना. शेवटीं पाहुण्याबरोबर मीहि अंथरुणावर पाय लांब केले ! माझ्याकडे आलेला हा पाहुणा म्हणजे माझ्या अंगांतील ताप होय !

गेले दोनतीन दिवस दवाखान्यांत न गेल्यामुळें आज डॉक्टरच मला तपासावयाला माझ्या घरीं आले. कानाला नळी लावून मला तपासल्यावर गंभीर मुद्रा करून ते मला म्हणाले, 'तुम्ही फार काळजी घ्यायला पाहिजे. हालून उपयोगी नाही. तुमच्याकडे आलेले पाहुणे साधेसुधे नाहीत. फार मोठे आहेत. जांवयाप्रमाणें तुम्हांला त्यांची बरदास्त ठेविली पाहिजे! तुमचा ताप मुदतीचा आहे. तरी पण फारसें घाबरण्याचें कारण नाही. मी हरप्रयत्न करून तुम्हाला या संकटांतून खात्रीनें सोडवीन.'

डॉक्टरांच्या या भाषणानें माझ्या मनांत केवढी खळबळ उडवून दिली! कांही क्षण तरी माझ्या मनाला धक्काच बसला. यावेळीं शेजारच्या बिऱ्हाडांतील एक गृहस्थ माझ्या खोलींत होतेच. लगेच त्यांच्याकडून घरच्या मंडळींना ताबडतोब येण्याविषयीं पत्र पाठविलें. मित्रमंडळींतहि ही बातमी हां हां म्हणतां पसरली. हळूहळू सर्वजण माझ्या खोलींत जमूं लागले व मला धीर देऊन तळहातावरील फोडाप्रमाणें जपूं लागले.

मी आजारी पडल्यावर लगेच माझ्या राहाणींत, वागणुकींत, आचारविचारांत एकदम स्थित्यंतर घडलें. एरव्हीं मी पांच मिनिटेंसुद्धां एकदम जागेवर स्वस्थ बसायची मारामार! भिंगरीसारखा सारखा फिरत असायचा. तोच आतां चोवीस तास अंथरुणावर पडून राहूं लागलों. कोणालाहि या स्थितीचा कंटाळाच येईल. पण मला त्यांतहि गंमतच वाटत होती. अशा स्थितींत विचार करण्याशिवाय मला दुसरा उद्योगच नव्हता. यावेळीं मी तक्तपोशीकडे सारखा टक लावून बसें. मधेंच डोळे किलकिले करीं. सहज खुदकन हसें. खुषींत येऊन हाताचीं बोटें छातीवर वाजवीं.

कोणाला वाटायचें त्या तक्तपोशीवर सुंदर तरुणीच बसली आहे! आणि खोटें काय म्हणून बोलायचें? खरोखरच तेथें एक तरुणी बसली

होती. तिचा बांधा जसा मोहक तशी तिची कांतीहि अवर्णनीय होती. तिच्या लावण्यानें कोणाचेंहि मन वेडावून गेलें असतें. पण तिच्या नयनांतील पावित्र्याचें तेज पाहून कोणाचेहि डोळे दिपून गेले असते; कोणीहि विनयानें मान खालींच घातली असती. इतर तरुणींच्या सौंदर्यांत काय कमी खुमारी असते ? आपल्या मोहक अंगविक्षेपांनी त्या कोणाचेंहि मन आकर्षून घेतात. त्यांच्या मादक नेत्रकटाक्षांनी किती तरी तरुण घायाळ होतात ! किती तरी तरुण त्यांना हृदयदेवता समजून त्यांची प्रणयाराधना करतात ! पण–पण–त्या तरुणींचें सौंदर्य विनाशी असतें. त्यांना वृद्धावस्था प्राप्त झाली म्हणजे तें कोठे निघून जातें कोणास ठाऊक ?

उलट आमच्या या साहित्यसृष्टींतील सुंदरीकडे पाहा ! आज पाहा, उद्या पाहा केव्हांहि पाहा. शेकडो वर्षांनी तिच्याकडे पाहिलें तरी तिच्या देखणेपणांत तिळमात्रहि फरक होत नाहीं. तिचें सौंदर्य अविनाशी असतें. कारण सुंदर तरुणीच्या अवयवांपेक्षां सुंदर शब्दांच्या अवयवांतील सौंदर्य चिरकाल टिकणारें असतें. मग कोणचा लेखक तिच्याकडे टक लावून पाहाणार नाही ? कोणाला तिचा ध्यास लागणार नाही ?

एरव्ही मी माझ्या पत्नीला अगर घरांतील इतर मंडळींना पाय चेपायला सांगितलें तर लगेच 'पाय दुखायला हो काय झालें ? चांगले तरणेताठे तुम्ही !' हें उत्तर ठरलेलें. पण तींच आतां मी न सांगतांहि माझे हातपाय चेपूं लागतात. आणि खरोखर प्रेमळ मातेच्या अगर पत्नीच्या आपल्या कपाळावरील थंडगार हस्तस्पर्शानें जें सुख होतें तें शेकडो अमृतांजनाच्या बाटल्या चोळूनहि होणार नाहीं.

एरव्हीं आम्ही घरांत नुसता धूपच काय पण कोणाच्या शब्दालाहि धूप घालीत नव्हतों ! तेच आतां संध्याकाळीं नित्य धूप घालूं लागलों व लोकांचा शब्दहि फुलाप्रमाणें झेलूं लागलों. एरव्हीं आठ पंधरा दिवसांनी आमच्या पलंगपोसाला अगर अभ्र्यांना पाणी मिळायचें तेंच आतां नित्य

मिळूं लागलें. नेहमीं वाड्यांतील मुलें आरडून ओरडून वाडा डोक्यावर घेत तींच आतां आपणहून शहाणपणानें गप्प बसत. एवढेंच नव्हे तर कोणी मोठ्यानें बोलूं लागले अगर बायका नळावर पाण्यावरून भांडूं लागल्या तर गप्प बसण्याबद्दल त्यांना उपदेश करीत !

एरव्हीं चार आठ दिवसांनी आमच्या घरीं डाकवाला फिरकावयाचा तोच आतां रोज हेलपाटे घालूं लागला आणि आमचा पत्रव्यवहारहि रोज होऊं लागला.

एरव्हीं कधीं गमतीखातर अगर त्या त्या फळांच्या मोसमांत आम्ही फळफळावळ आणायचे तेच आतां रोज फळें आणूं लागलों ! प्रेमळ बालकांचा आणि फळांचा किती निकट संबंध ! कारण दोन्हीहि सबाह्य अंतरीं गोडच ! आपण मुसंबे सोलीत असतांना त्यांच्या अधीर व हसऱ्या चेहऱ्यावर जे मनोविकार उमटतात ते पाहून आपल्याहि अन्तःकरणांत किती तरी सात्त्विक आनंदाच्या लहरी उत्पन्न होतात. खरोखर हा आनंद म्हणजे जीवनसत्त्वांनी युक्त असें कॉडलिव्हरच होय ! एखाद वेळीं आपण मुलांना चुकवून फळें खाल्लीं तर 'तुम्ही मुसंबे खाल्लेत, तुमच्या हाताला मुसंब्याचा वास येत आहे.' असें त्यांनी म्हटल्यावर त्यांच्या चाणाक्षपणाचें किती कौतुक वाटतें.

म्हातारपण हें दुसरे बाळपण असें म्हणतात. कारण म्हाताऱ्याच्या तोंडाचें बोळके लहान मुलें खेळायला घेतात. पण आजारपण हें सुद्धा दुसरें बाळपणच असतें. कारण लहान मुलाप्रमाणें आजारी माणसाचे सर्व सोहाळे होत असतात. आजारी माणसानें स्वतःविषयीं यत्किंचितहि काळजी घेतली नाही तरी घरांतील वडीलधारीं माणसें त्याची लहान मुलाप्रमाणें काळजी वाहातात. लहान मूल दूध प्याल्यावर त्याच्या ओठावरील दुधाचे थेंब प्रेमळ माता आपल्या पदरानें पुसते. आजारी मनुष्यहि दूध अगर मुसंब्याचा रस पितांना तो अंगावर सांडूं नये म्हणून त्याच्याहि हनुवटीखालीं

रुमाल धरतात. आजारी माणसानें लहान मुलाप्रमाणें कोणचाहि हट्ट घेतला तरी तो ताबडतोब पुरवावयाची सान्यांची धडपड. पण लहान मुलांपेक्षां एका बाबतींत आजारी मनुष्य दैववान् असतो. लहान मुलांना मधून मधून पाठीवर मिळणारा खाऊ याला चुकूनहि कधीं मिळत नसतो. आजारांतून उठल्यावर सुद्धां त्याचें लहान मुलाप्रमाणेंच कौतुक होतें. ‘ आज तो उठून बसला. आज तो हात धरून चालायला लागला, आज आपणहून दिवाणखान्यांत येऊन तक्क्याशीं बसला. आज तो जेवायला लागला,’ इत्यादि नातलगांना लिहिलेल्या पत्रांतील मजकूर वाचतांना आपणाला लहान मुलांचीच आठवण होत नाही काय ?

मी आजारी पडल्यावर माझी नातलग मंडळी मला भेटायला येऊं लागली. माझ्याजवळ घटकाभर बसून, माझ्या तोंडावरून ममतेने हात फिरवून ‘ आतां बरं वाटताय ना ? वाटेल हो लवकर बरं. ’ वगैरे सान्तवनपर उग्दार काढीत. त्यावेळीं तापानें माझें सारें अंग फणफणत असलें तरी त्या शब्दांनी मला परम संतोष होई.

माझे एक विरक्त वृत्तीचे स्नान संध्याशील असे आप्त मुद्दाम लांबून मला भेटायला आले होते. त्यांनी मला अंगारा लावून, तीर्थ प्यायला देऊन ‘ परमेश्वर माझें उर्वरित आयुष्य तुम्हाला देवो ’ असें म्हटल्यावर कितीतरी सात्विक भावना माझ्या मनांत उचंबळून आल्या. ही नातलग मंडळी माझ्या शेजारींच खोलींत बसून गप्पा मारीत. त्यांच्या भाषणानें मला कधी हुंदका येई, कधी उद्वेग वाटे तर कधी माझी करमणूक होई. व मनुष्य स्वभावाचे निरनिराळे नमुने मला सहजासहजीं पहावयास मिळत.

त्यांच्या भाषणांतील कांहीं वाक्यें जीं माझ्या स्मरणांत राहिलीं तीं खालीं देतों.

“ आमच्या रामूला सुद्धां असाच मुदतीचा ताप आला होता हो ! कफानी छाति नुसती डबडबली होती. अळशीच्या पोटिसांन सारखी छाति

शेकीत होतें मी. माझ्या डोळयाला डोळा नाही लागला वीस दिवस. पण एक-विसाव्या दिवशीं देवाच्या दयेनें त्याचा ताप निघाला नि त्यादिवशीं मला सुखाची झोप लागली. " " मला वाटतं रामूच्या दुखण्यांतच तुमच्या पाटल्या मोडल्या नाही हो ! "

न मोडून कुणाला सांगूं ? इकडे सारा २५ रु. पगार ! आणि डॉ. चें बिल झालें १५० रु. बिल पाहून ह्यांनीं जेव्हां डोळयाला उपरणें लावलें तेव्हां दिल्या मी आपल्या हातांतील पाटल्या काढून. "

" अहो तुमचे नुसते १५० रु. च गेले, पण आमच्या वसंताच्या दुखण्यांत किती पैसा खर्च झाला याचा पत्ताच नाही. एकसष्ट दिवसांचा त्याला टायफॉईड झाला होता. ७० वेळां तर नुसत्या डॉक्टरच्या आमच्या घरीं खेपा झाल्या. पंचवीस इंजक्शनें झालीं. सहा थर्मामिटर फुटले. ८० पौंड नुसता बर्फ लागला. फळं काय नि पाहुण्या माणसांचीं जायचीं यायचीं भाडीं काय कांही विचारूं नका. ५०० रु. वर सहज धूम गेली असेल!"
" आमच्या बनीला टायफॉईड झाला पण अठराव्या दिवशी खलास ! पंडितांच्या बाळूची तीच तऱ्हा. सारा नऊ दिवसांचा खेळ ! नवज्वर होतो काय नि त्यांत त्याचा अंत होतो काय ? कार्टी मरतात तीं मरतात, नि जातांना बापाला कर्जाच्या खड्डयांत टाकून जातात ! त्यापेक्षां अपघातानें मेलीं तर काय वाईट !!

गेल्या कांहीं वर्षांत अनेक कारणांमुळें मला कर्ज झालें होतें. माझ्या समाचाराला येणाऱ्या मंडळींत धनकोहि येत. पण किती निराळ्या अर्थानें. माझ्या अपरोक्ष डॉक्टरकडे एक दिवसाआड जाऊन माझ्या प्रकृतीची चौकशी करीत ! बरे होतीलना ? उताराकडे कल आहेना ? तशी कांही धास्ति करण्याचें कारण नाही ना ? काय हो यांनी विमा किती हजारांचा उतरला आहे कांहि माहीत आहे तुम्हाला ? इत्यादि प्रश्न दहा दहा वेळां विचारीत. पण खरे सांगायचें म्हणजे माझ्या जिवापेक्षां त्यांना त्यांच्या पैशाची काळजी अधिक होती.

माझी मित्रमंडळीहि मला रोज भेटायला येत. ' मित्रं प्रीति रसायनं नयनयो: आनन्दजं चेतसः ' या कवीच्या सुभाषिताची यावेळीं कोणाला आठवण होणार नाहीं ? पण खरे मित्र किती हाताच्या बोटांवर मोजण्याइतके असतात याची पारख याच वेळीं होते. एखादे वेळी मी पैशाच्या गोष्टी काढून ' हल्ली कसा मी टंचाईत आहे, दिडकी कोठून येत नाही ' वगैरे गोष्टी सांगून आतां मी माझ्या मित्राजवळ उसनवारीची गोष्ट काढणार तोंच ' सोमण, हल्ली मी फार तंगींत आहे. कांही विचारूं नको. पैशाच्या काळजीन रात्रीं झोप येत नाही. कुठेतरी तीन चारशे रुपये मिळाले तर पाहाणार आहें. तुला सवड होईल का द्यायला ! ' हें त्याचें उत्तर ऐकून मी त्याच्या देखत तोडांत बोट घातलें. आणि आदल्या दिवशींच या मित्राचें कुटुंब आमच्याकडे येऊन ' देवानं आतां आम्हाला सुखाचे दिवस दाखवलन हो. आतां आमचं चांगल चाललं आहे. दर महिन्याला ५० रुपये हल्लीं शिल्लक पडतात. गेल्या वर्षात आम्हीं ८०० रु. बँकेंत टाकिले आहेत. आतां मी गळयांतील पोत घ्यायला सांगणार आहें. ' इत्यादि वाक्यें तिनें आमच्या कुटुंबाजवळ उच्चारतांना मी ऐकिलीं होतीं !

पण माझे काही मित्र रात्रीच्यावेळीं मला भेटायला येत. माझ्या खोलींत यावेळीं कोणी येणार नाही हें पाहूनच ते येत. ते अनवाणी येत व अनवाणीच जात. किती यांचें हळुवार मन ! मला ताप आलेला पाहून यांचेहि अंग कढत होई. माझ्या गतायुष्याचें सिंहावलोकन मी यांच्याजवळच करीं. माझ्या अपयशाचे पाडे मी यांच्याजवळच उच्चारीं. माझ्या महत्वाकांक्षांचे मृत्युलेख मी यांनांच वाचून दाखवीं. माझ्या अंतरींची सारी मळमळ मी यांच्याजवळ ओकीं. पण मी गाढ निराशेंत वावरत असतांना तेच मला आशेचा किरण दाखवीत. ' सर्व दिवस कांहीं सारखे नसतात. तुझा भविष्यकाल रम्योज्वल आहे. तुझे मनोरथ खात्रीने परिपूर्ण होतील ' वगैरे शब्दांनी तेच मला धीर देत. ओळखलेत का माझे हे मित्र ? माझे हे मित्र म्हणजे अश्रू —नयनांतील अश्रू— होत !

अशा रीतीनें आप्तेष्टांच्या सान्निध्यांत हां हां म्हणतां माझे वीस दिवस निघून गेले. आणि अत्यंत आनंदाचा असा एकविसावा दिवस उजाडला. त्या दिवशी पहाटे माझ्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. इतका कीं माझे सर्व कपडे घामानें चिंब झाले. घाम पुसल्यावर मी काखेंत तापनळी लाविली. परीक्षेचा निकाल ऐकतांना आपणाला जशी उत्कंठा लागते तशीच उत्कंठा तापनळीवरील निकाल ऐकतांना सर्वांना लागली. माझें उष्णतामान ९६° पर्यंत उतरलेलें जेव्हां ऐकलें तेव्हां सर्वांचाच जीव भांड्यांत पडला. माझा पुनर्जन्म झाला म्हणून पुत्रजन्माप्रमाणें ही आनंदाची बातमी जो तो माझ्या ओळखीच्या मंडळींना सांगू लागला. परमेश्वर कृपेने माझ्यावरचें मोठे गंडांतर टळलें म्हणून मीहि त्या दयाघन प्रभूची अनन्यभावें करूणा भाकली. आणि याचवेळीं माझ्या खोलींत इतके दिवस अष्टौप्रहर बसलेले यमाचे पहारेकरी कंटाळून निघून गेले !

---

# कोण ही अशी !

मी केव्हांही बाहेरून येवो. सर्वांच्या अगोदर तूं माझ्या नजरेस पडतेस मला नजरेचा नजराणा देतांना विनयानें लाजत, हो, अगदी अदबीनें उभी असतेस. पण मला तुझा राग येतो. नेहमीं आपली नव्या नवरीप्रमाणें लाजत कां ग उभी ?

किती साधी तुझी राहणी. जणूं कांहीं ऋषींच्या आश्रमांतील वनकन्यका ! किती तुझा आनंदी स्वभाव ? आणि कामाचा उरक तरी किती ! पदर सांवरून कामाला सदा आपली उत्सुक. तुझ्या अंगांत जादू तरी किती ? कोठेंहि तुझा प्रेमळ हात फिरो. सोन्याहून पिंवळें करतेस तूं.

अनेक संत कवींनीं पूज्य देवतांबद्दल थोडीं कां स्तोत्रें गाइलीं आहेत ? पण मला राहून राहून आश्चर्य वाटतें कीं, कोणाचेंच कसें तुझ्याकडे लक्ष गेलें नाहीं. पण आतां त्याचें काय होय ? मीच आज तुला 'वाग्देवीच्या पवित्र मंदिरांत घेऊन जातों.

संत लोक मनांतील केर काढतात. तूं सुद्धां घरांतील केर काढून तें आरशासारखें स्वच्छ ठेवतेस. तुझ्या विवाहित तरुण मैत्रिणी गतरात्रीच्या सुखाच्या कल्पना मनाशीं खेळवीत रोज तुझ्याकडे येतात. त्यावेळीं तुझा उत्साह व आनंद द्विगुणित होतो. त्या मैत्रिणींच्या सहवासांत तूं आपल्या कामसूपणाची हौस पुरी करून घेतेस. घरांतील केर काढतांना त्या, व तूं आनंदानें नागमोडीप्रमाणें घेर घेतां घेतां एखादे वेळीं तुझा पदर सुटतो. पण खेळण्याबागडण्यांत तिकडे तुझें लक्षच जात नाही. खेळणें आटोपतांच तुझ्या मैत्रिणी तुझा चटकन् पदर खोंवतात. अशावेळीं तुमचा डोळा चुकवून मी तुमचे खेळ पाहात असतों. त्यावेळीं आनंदानें मन उचंबळून नयनाश्रूंचें गुलाबपाणी तुमचें स्वागत करावयास उत्सुक असतें.

केर काढणें झाल्यावर तुझ्या मैत्रिणी वेणीफणी करावयास जातात. अशा विश्रांतीच्या वेळींसुद्धां तूं आपले ओंचे सांवरून उभी असतेस.

एवढें काम संपल्यावर तूं अंमळ पाय लांब केलेस तर कोणी नको का म्हणत आहे ? पण भवितव्यतेनें तुझ्या ललाटीं निराळेंच लिहून ठेविलेलें असतें याची तुला काय कल्पना ? आपल्या मैत्रिणींच्या सहवासांत आयुष्य सुखांत घालवण्याचें भाग्य तुला फार थोडें असतें. तारुण्याप्रमाणेंच तुझ्या सुखालाही मर्यादा असते. जसजशी तुझ्या रूपाला तसतशी तुझ्या सुखालाही उतरती कळा लागते. अशा वेळीं तुझी फार शोचनीय स्थिति होते. तुझ्यात मोठें परिवर्तन घडतें. मुलाबाळांनीं गजबजलेल्या घरांत वावरण्याचें तुझें भाग्य संपतें. तरी पण तूं आपलें कार्य सोडीत नाहींस. "जया अंगीं मोठेपण, तया यातना कठीण " ही उक्ति तूं सार्थ करतेस. अशा हलाखीच्या दिवसांत सुद्धां तुझ्या मैत्रिणी तुला अंतर देत नाहींत, हें पाहून तूं समाधानाचा सुस्कारा सोडतेस.

आतां तें अदबीनें कोंपऱ्यांत लाजत उभें राहणें गेलें. कारण तुझ्या हल्लींच्या विपन्नावस्थेंत लाज हा शब्दच तुला लाजेसारखा वाटतो. एखाद्या नूतन बालविधवेप्रमाणें सारा दिवस तूं काळोखांत बसून घालवतेस. अशावेळीं निर्दय चेष्टेनें तुझ्या अंगावर पाणी—मग तें हात धुतलेलें, खरकटें असो किंवा कसेंहि असो—घरांतील मंडळी उडवतात. साऱ्या दिवसभर तुला थंडीनें कुडकुडत बसावें लागतें. अशा दुःखमय स्थितींत रात्रींच्या वेळीं तुझ्या मैत्रिणी तुला भेटतात. पण त्याहि दिवसभर कामानें थकलेल्या भागलेल्या असल्यामुळें फारच थोडा वेळ तुझ्याजवळ बोलतात. त्या गेल्यावर मग चोवीस तासांत तुझ्याकडे कोणी ढुंकूनसुद्धां पाहात नाहींत. 'जग हें दिल्या घेतल्याचें ' असें म्हणत तूं स्वस्थ बसतेस, शोक करतेस, क्वचित् जळफळतेसहि. आयुष्याचे शेवटचे दिवस अशा हालांत तुला काढावे लागतात. खरोखर दैवगति मोठी विचित्र आहे. जोपर्यंत आपल्या अंगांत त्राण आहे, तोपर्यंत आपणास जगांत मान आहे, असेंच तुझ्या आयुष्याचें सार नाही का ? अशी ही सुखान्तीं दुःख अनुभवणारी कोण असेल बरें ? कोण म्हणजे केरसुणी ! हो हिरांची केरसुणी ! !

———

## १४

लग्नांत मांडवपरतण्याचे दिवशीं जांवई सरळपणें स्नानाला कधीं तरी उठला आहे का? तो रुसला नाहीं असें कधीं तरी झालें आहे का? या वेळीं कोणी बैलगाडीचा तर कोणी मोटारगाडीचा, कोणी ग्रामोफोनचा तर कोणी घड्याळाचा, कोणी अंगठीचा तर कोणी पोचीचा हट्ट धरून बसतात. आणि सासऱ्यानें हा गोड हट्ट पुरविल्याशिवाय जांवयाची स्नेही-मंडळी व आसेष्ट त्यास स्नानास उठूंच देत नाहींत.

आमचे वसंतरावहि आपल्या लग्नांत 'झेनिथ' कंपनीच्या घड्याळाचा हट्ट धरून बसले होते. हें घड्याळ द्यावयाचें म्हणजे शंभर-सवाशें रुपयांचा खर्च आला. पण सासऱ्याची गरिबी असून अजून त्यांस पांच मुलींचीं कार्येंहि करावयाचीं होतीं. तेव्हां मेटाकुटीनें ३० रु. पर्यंतचें घड्याळ देण्यास तो तयार झाला. पण जांवई सारखे "झेनिथ' पाहिजे, घेईन तर 'झेनिथ'च घेईन" असा हट्ट धरून बसले. दोन वाजले तरी जांवई स्नानाला उठेनात. जांवयाची व इतर मंडळींची विनवणी करून मंडळी थकून गेली. शेवटीं वसंतरावांचा सासरा काकुळतीला येऊन मला म्हणाला, "तुम्ही तरी आमच्या जांवईबुवांची समजूत घाला. चला तर माझ्या बरोबर, शेवटचा उपाय करून पाहूं." मीं म्हटलें, "अण्णा, तुम्ही एवढें डरतां कां? पांच मिनिटांत वसंतरावांना एक सोडून दोन झेनिथ आणून देतों."

नंतर थोड्याच वेळांत मी व अण्णा व्याह्यांकडे गेलों. मी म्हटलें "वसंतराव, तुम्हांला काय पाहिजे?"

"झेनिथ."

"अगदीं नक्की."

"हो हो, झेनिथ, झेनिथ, झेनिथ."

“बरं आहे, एक सोडून दोन झेनिथ देतों.” असें म्हणून जेव्हां दोन ‘झेनिथ’ द्राक्षासवाच्या बाटल्या मी वसंतरावांपुढें ठेविल्या तेंव्हां एकच हंशा पिकला!

१५

आमच्या गांवचे आबा देवधर आपल्या मुलीला गेलीं दोनतीन वर्षें स्थळें पाहत होते. पण त्यांना मनासारखें स्थळ मिळत नव्हतें. त्यांची मूळची गरिबी; पण मुलीचें सौंदर्य हें त्यांच्याजवळ मोठें भांडवल होतें. आपला जांवई हुशार, पदवीधर, प्रथमवर, श्रीमंत पण हुंडा फार न घेणारा—चारशें म्हणजे डोक्यावरून पूर—असला पाहिजे; अशी त्यांची इच्छा होती. मी पुण्यास असल्यामुळें त्यांनीं मला ठिकाणें पाहण्याविषयीं सुचविलें होतें. पण मला वेळ नसल्यामुळें मी तें काम आमचे उपाध्ये घारंभट यांजवर सोंपवलें होतें. लवकरच आबांना पाहिजे तसें स्थळ घारंभटांना मिळालें. मुलगा एम्. ए., एम्. डी., वय २७ चे घरांत, प्रथमवर, गोराभुरका, तीनशें साडेतीनशेंच्या आंत सहज सुटणारा असा होता. मी आबांस ताबडतोब पत्रानें मुलाची माहिती कळविली. पत्र वाचून त्यास अत्यानंद झाला व पोरीनं नशीब काढलंन् म्हणून त्यांनीं रामाला पैशाची खडीसाखरसुद्धां वाटली. दुसऱ्या दिवशीं ते मुलीसह माझ्या बिऱ्हाडीं येऊन थडकले. दुसरे दिवशीं सकाळीं आम्हीं उभयतां नारायण पेठेंत मुलाच्या बिऱ्हाडीं गेलों. खोलीबाहेर विनायक महादेव ओक M. A., M. D. ‘आहेत’ अशी पाटी होती. खोलींत खुर्च्या मुळींच नव्हत्या. एक गादी उलगडलेली होती, आणि तिच्यावरील चादरीनें आपल्या सगळ्या अंगाला तेल चोपडलेलें होतें. पण स्नान करण्यासाठीं ती मालकाच्या परवानगीची वाट पाहात होती!

त्या गादीवर तीनचारजण बसलेले होते. त्यांच्या पोशाखावरून ते आचारी, वाढपी असावेत असेंच कोणालाहि वाटलें असतें. एकदां वाटलें हे एम्. ए.,

एम्. डी. आहेत. कदाचित् कम्युनिस्ट असतील व बसलेली मंडळी गिरणी-कामगार असतील कोणी सांगावें ? मी एकदम प्रश्न केला " विनायक महादेव ओक आपणच ना ? "

" होय. "

" आपण पुण्याचे स्थायिक, का ? "

' छे, छे ! मी देवगडचा राहणारा. माझी घरची अगदीं गरिबी. '

' गरिबाचीच माणसें डोकीं वर काढतात. आपण एवढें शिक्षण घेतलेंत हें आपणाला फार भूषणावह आहे. '

' छे ! छे ! माझें फार शिक्षण झालें नाहीं. '

' हा आपला विनय आहे. आपण एम्. ए. केव्हां झाला ? '

' मी अगोदर एम्. डी. झालों १९३२ सालीं; मग नीट नोकरी चालेना म्हणून मागाहून एम्. ए. झालों. '

' आपण फर्ग्युसोनियन का परशुरामियन ? '

' छे हो, मी चार बुकं इंग्रजी शिकलों आणि पुढें या धंद्यांत शिरलों आहे. आपणाला मी फार वेळ बुचकळयांत ठेवत नाही. मी एम्. ए., एम्. डी. म्हणजे मोटार एजंट आणि मोटार ड्रायव्हर आहे !

## १६

हे पाहिलेत का आमचे सदाशिवराव टिळक ? फर्ग्युसन कॉलेजमध्यें शिकत आहेत. नवमतवादी आहेत अर्थात् भाईहि आहेत. आतां ते आपल्या खोलीत खुर्चीत सिगारेट पीत बसले आहेत. पण हे कोण त्यांच्या खोलीकडे जात आहेत ? त्यांच्या पोषाखावरून ते कोणी तरी भिक्षूक असावेत असें वाटतें. कारण त्यांच्या नेसूं सव्वादोन हाती पंचा, पायांत कोकणी वहाणा, अंगांत बाराबंदी, डोक्यावर जर विटलेलें जुनें पागोटें, हातांत सोळा काड्यांची छत्री व तोंडांत तमाखू असल्यामुळें तिचे तुषार

हनुवटीवर व बंडीवर पडत होते. ते खोलींत शिरले तेव्हां टिळक एकदम चपापले व हातांतल्या हातांतच त्यांनीं सिगारेट विझविली. पण धूर खोलींतच वावरत होता. पण टिळकांच्या वडिलांना पंधराव्या वर्षापासून विड्या ओढण्याचा नाद असल्यामुळें त्यांनी मुलाच्या धूम्रपानाकडे काना-डोळा केला.

पंढरपूरला जाण्यासाठीं सदाशिवरावांचे वडील पुण्यास आले होते. संध्याकाळीं त्यांना कांहीं सामान खरेदी करावयाचें होतें म्हणून बापलेक बुधवार पेठेंत गेले. रस्त्यांतून चालतांना त्या दोघांमध्यें नेहमीं दोन वावांचें अंतर असे. सदाशिवराव नेहमीं पुढें असत. वाटेंत त्यांचा मित्र यशवंत-राव काळे हा भेटला. तो लगेच सायकलवरून उतरला. त्या दोघांमध्यें शब्दांची देवघेव कशी झाली ती पहा—

काळे—हॅलो टिळक !

टिळक—हॅलो.

काळे—कसं काय ?

टिळक—ओ. के.

काळे—आज 'हिल'वर नाहीं गेला ?

टिळक—नाहीं गेलों आज.

काळे—मग आज 'मंडळी'ना चुकल्या चुकल्यासारखें होईल !

( इतक्यांत टिळकांचे वडील त्यांच्याजवळ येऊन उभे राहतात, त्यांना पाहून आश्चर्यानें ) टिळक ही चीज आज कोण बरोबर आणली आहेस ?

टिळक—एक गेस्ट आहेत !

काळे—( मिस्किलपणें हसत ) गेस्ट ! कुठले ?

( वडिलांना इंग्रजी येत नसल्यामुळें अजून उलगडा झाला नव्हता. )

टिळक—( हलकेंच ) आमच्या गांवचे.

'अस्सं आमच्या गांवचे काय ? आतां माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मी बाप म्हणून सांगायची याला लाज वाटते ! करायचा काय असला कार्टा ?' त्यांच्या तळपायांची आग मस्तकाला गेली व भर बुधवारांत ते सदाशिवरावांना शिव्या देऊं लागले. इतक्यांत त्यांच्या कॉलेजमधील दोन मैत्रिणी तेथून जात असतांना त्यांच्या कानांवर वडिलांच्या शिव्या पडल्या. त्या वेळीं मैत्रिणींची व टिळकांची नजरानजर झाल्यावर ते किती वरमले असतील हें एक त्यांच्या मैत्रिणीच जाणोत !

## १७

तुळशीचें लग्न झाल्यावर मुलीचे वडिल वरसंशोधनार्थ बाहेर पडतात. आपला दागिना पटविण्यासाठीं त्यांना किती हिकमती लढवाव्या लागतात, कांहीं विचारूं नका. सुमारें सात आठ वर्षांपूर्वी मी व आमच्या गांवचा हरि कुंटे एकाच खोलींत राहत होतों. त्या वेळीं आम्हीं दोघेहि लग्नाचे होतों. आमचीं ठिकाणें साधारण बऱ्यांपैकीं असल्यामुळें व आमच्या गांवचे दोन भिक्षुक पुण्यास राहत असल्यामुळें आमची नवरदेव म्हणून सहजासहजीं ज़ाहिरात होत असे. साहजिकच पुष्कळ मुलींचे बाप आम्हांस भेटावयास येत. 'या बाबतींत आमच्या हातांत कांहीं नाहीं, आम्ही फक्त हुकुमाचे धनी आहोंत, तुम्हीं आमच्या वडिलांना भेटा' असें आम्ही त्यांस सांगत असू.

एकदां एक अतिशय देखणे गृहस्थ आपल्या परकर नेसलेल्या लहान मुलीला घेऊन आमच्या खोलींत आले. सदर गृहस्थ धुळ्यास वकिली करीत होते. त्यांनीं बरोबर आणलेली मुलगीहि त्यांच्याप्रमाणेंच देखणी होती. ते हरीला म्हणाले 'मी आपल्या गांवीं गेलों होतों. वडिलांना मुलगी पसंत आहे, पण मुलगा प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावा व मुलास मुलगी पहावयाची असल्यास त्यास बरोबर घेऊन जावें म्हणून मुद्दाम पुण्यास आलों आहें. मुलगी या आमच्या मुलीपेक्षां कांकणभर सरसच आहे.'

हरि लाजत पण गालांतल्या गालांत हसत म्हणाला ' मी वडिलांच्या बाहेर नाहीं, मुलगी पहायला नको. '

चहा घेतल्यावर ते तेथून निघाले. आपल्या भावी पत्नीचें रूप डोळ्या-पुढें आणआणून हरि किती खूष झाला असेल, आणि मीहि त्याची किती चेष्टा केली असेन, कांहीं विचारूं नका !

आमच्या परीक्षेच्या अगोदर पंधराच दिवस लग्नाचा मुहूर्त असल्यामुळें हरि एकटाच आपल्या गांवीं लग्नाला गेला. पण लग्नाच्या दिवशीं भटजींनी अंतरपाट काढल्यावर हरि माळ घालूं लागला तों एकदम स्तंभितच झाला. कार्ल्यांची भाजी खाल्ल्यासारखें वाईट तोंड करून त्यानें मोठ्या नाखुषीनें मुलीला माळ घातली. कारण मुलगी अगदीं कुरूप होती. वकीलसाहेबांचें अगदीं लहानपणीं गरीब स्थितींत असतांनाच लग्न झालें होते. बायको कोळशांतलें माणिक होतें. आणि मुलगी आईच्या वळणावर होती !

## १८

बी. ए. ची परीक्षा आटोपल्यावर मी व माझा मित्र मधुकर गुप्ते एकाच गाडींत बसून गांवीं जाण्यास निघालों. मी कर्जत स्टेशनवर उतरलों व मधुकर पुढें ठाण्यास उतरला. त्यानंतर जूनमध्यें पुणें येथें भेटल्यावर आम्ही एकमेकांचें हसतमुखानें स्वागत केलें. कारण आम्ही दोघेहि पास झालों होतों. बरेच दिवसांनीं मित्र भेटले कीं चार दोन घटका मनमोकळे-पणें गप्पा मारल्याशिवाय जिवाला समाधानच वाटत नाहीं. तेव्हां रस्त्यांत किती वेळ बोलत उभे राहणार म्हणून आम्ही दोघे मधुकरच्या खोलीवर गेलों. चहा झाल्यावर आम्ही गप्पांच्या ऐन रंगांत असतांना व एकीकडे हास्याचे मजले उडवीत असतांना मधुकर मला टाळी देऊन म्हणाला, " अरे तुला एक मजा सांगायची विसरलोंच. माझ्या बुद्धिमत्तेची तारीफ करतांना तू मला गौरवानें नाना फडणवीस म्हणतोस. पण परवां मी असा चकलों कांहीं विचारूं नकोस. अजून त्या गोष्टीची मला चुटपुट लागली आहे."

" असं झालं तरी काय ? "

अरे सुट्टींत ठाण्याचा आला कंटाळा. म्हणून गेलों अलिबागला बहिणीकडे, चार दिवस मजेंत घालवायला. तिच्या सासरचं कुटुंब मोठं. घरांत तिच्या नात्यागोत्याचीं सर्व माणसें मोजलीं तर सहज पन्नास भरतील. अरे परवा विधिमंडळाची निवडणूक झाली तर या एका घरांतलीं १२० मतें मिळालीं. पण तिचा सासरा पक्का मुरब्बी. त्यानें फुकाफुकीच का मतें"—

" ए धुंडीराज, अरे मूळ मुद्द्यावर ये " मी म्हणालों.

" अरे कसलं काय. मी जसा माझ्या बहिणीकडे पाहुणा म्हणून गेलों होतों तशी तिच्या दिराची मेहुणीहि आली होती चार दिवस. "

" लग्न व्हायचं होतं वाटतं तिचं ? "

" तर मग सांगतों काय ? अलिबागला एक दोन स्थळें होतीं, म्हणून तिला दाखवायला आणली होती."

" मग ती सुंदर असल्यामुळं तूच तिला मागणी घातलीस कीं काय ?"

" ऐक रे जरा. रात्रीचे आम्ही सर्व मंडळी पत्ते खेळायचे; मग ओळख व्हायला किती उशीर ! माझ्या हातांत जड पानें असून सुद्धां मीं जेव्हां जेव्हां हलक्या पानाचा तिला झब्बू देई तेव्हां ती हसायची व मीहि हसायचो ! "

" वा ! चांगली गोष्ट आहे ! "

" अरे पण गंमत तर पुढंच आहे. आपण म्हणतों भावाभावांचे बहिणी-बहिणींचे तोंडवळे सारखे असतात म्हणून. पण त्याला ती अपवाद होती. त्यांच्याकडे एक कारकून होता. त्याच्यासारखा तिचा तोंडवळा वाटे. म्हणून मी तिला त्या कारकुनाची मुलगीच समजत होतों. अर्थात् कारकून आमच्याबरोबर खेळायला नसल्यामुळं मी तिच्याकडे बिनधोकपणें पाहात असें व तीहि हसत असे; पण एक दोन दिवसांनीं ही गोष्ट माझ्या बरोबरीचा एक मुलगा तिथं होता त्याच्या तेव्हांच ध्यानांत आली व तो माझी चेष्टाहि करूं लागला. शेवटीं या प्रकरणांत आपला कांहीं एक संबंध नाही व आपला

उजळ माथा राहावा म्हणून मी बहिणीच्या दिराच्या कानावर घातलें कीं, " ती कारकुनाची मुलगी माझ्याकडे सारखी टक लावून पाहाते व हसते. तिचं लग्न व्हावयाचं आहे व माझंहि व्हावयाचें आहे. लोक भलताच संशय घ्यायचे, तेव्हां तुम्ही हळूच कारकुनाला ही गोष्ट कळवा." पण तिचा दीर गंभीर चेहरा करून म्हणाला, " ती माझी मेव्हणी आहे ! "

## १९

सुशिक्षित तरुण-तरुणींचीं लग्नें झाल्यावर पहिले कांहीं दिवस तरी परस्परांविषयीं तीं साशंक असतात हें उघड आहे. मग याला आमचे बन्याबापू व ज्योत्स्नाताई कशा अपवाद असणार? दोघेंहि सुशिक्षित पदवीधर. एक मास्तर तर दुसरी मास्तरीण ( सुतार-सुतारीण; सोनार-सोनारीण याप्रमाणें नव्हे, तर खरोखरीची ). रजिस्टर पद्धतीनें दोघांचा विवाह झालेला. जोत्स्नाताईचें व्यक्तिस्वातंत्र्य इतक्या थराला गेलेलें कीं, लग्न झाल्यावरसुद्धां त्या माहेरचें नांव लावीत. एवढेंच नव्हे, तर पाठी-मागें 'कु.' लावीत ! पण गळ्यांत मंगळसूत्र घालीत ! या बाबतींत बन्याबापूची मित्रमंडळी उघड चेष्टा करीत ! 'एवढा कसा रे तूं नेभळट ?' तुला तुझ्या नांवांची सुद्धां तिच्यावर छाप पाडतां येऊं नये ना ?' असें म्हणून त्यास खुशाल खिजवीत. रजिस्टर लग्न झाल्यावर अहेर करतां आला नाहीं म्हणून तर त्याची मित्रमंडळी हा शब्दांचा अहेर करीत नसतील ना ? पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, बन्याबापू आपल्या पत्नीचीच कड घेत!

पोट कुणाला सुटलं आहे? दोघांनीं महिनाभर घेतलेली रजा हां हां म्हणतां संपली. शाळेचें चक्र सुरू झालें. एक दिवस बन्याबापू शाळेंतून आल्यावर पाहतात तों ज्योत्स्नाताई ट्रंक उघडून हातांत एक फोटो घेऊन खिन्नपणें विचार करीत बसल्या होत्या. बन्याबापू जवळ जाऊन पाहतात तों, तो फोटो एका तरुणाचा होता. त्यांना पाहून त्यांनीं चपापून फोटो

ट्रंकेंत ठेवला व त्या चहा करण्यासाठीं लगबगीनें उठल्या. स्टोव्ह पेटवि-ण्यासाठीं स्पिरिटच्या काकड्याला त्यांनीं काडी लाविली. इकडे बन्या-बापूच्या मनःस्वास्थ्यालाहि काडी लागली. ज्योत्स्नाताईचा स्वभाव खेळकर व विनोदी असल्यामुळें त्या चहा करतांना नेहमीप्रमाणें हास्य–विनोद करूं लागल्या, पण आज बन्याबापू मात्र वरकरणीच हसत होते. हें पाहून " आज काय होतं आहे ? रोजच्यासारखे हसत बोलत कां नाही ? " असें तिनें विचारल्यावर " कांहीं नाही ! आज जरा कपाळ दुखतें आहे. " असें त्यांनीं उडवाउडवीचें उत्तर दिलें. पण चहा पितांना " आपल्या संसार–सुखाचें वाटोळें झालें. आपण या लग्नाच्या फंदांत उगीच पडलों. हिच्या आणखी काय काय भानगडी असतील परमेश्वराला माहीत ! पण आजच गवगवा करण्यांत काय अर्थ ? " वगैरे विचार त्यांच्या मनामध्यें डोकावून गेले. यानंतर पुन्हा आठ दिवसांनीं बन्याबापू शाळेंतून आल्या-वर पूर्वीप्रमाणेंच प्रसंग घडला. यावेळीं मात्र त्यांना राहवलें नाहीं. ते रागानें लाल झाले. व " तुला हे धंदे करायचे होते तर माझ्याशीं लग्नच कां केलेंस " असें तिला त्यांनीं स्पष्टच विचारलें.

" म्हणजे तुम्ही म्हणतां काय ? कसले धंदे ? मला कांहींच उमज होत नाहीं. "

" वा ! वा ! तूं तर फार साळसूद ! आपल्या मनालाच विचार ! "

" म्हणजे बाई आश्चर्यच आहे ! असें एकाएकी रागवायला काय झालें. ? "

" काय झालें ? तो फोटो कुणाचा ? ही छपवाछपवी किती दिवस टिकेल ? "

" हं ! तो फोटो ना ? अहो, तो फोटो तर माझ्या मावसभावाचा आहे. "

" मावसभावाचा ? "

„ हो—हो मावसभावाचा. एका क्रांतिकटाच्या खटल्यांत सांपडल्यामुळें गेलीं सहा वर्षे तो तुरुंगांत खितपत पडला आहे. सध्या तो क्षयानें आजारी आहे. मग त्याचा फोटो पाहून माझं मन कां नाहीं खिन्न होणार?

## २०

वार्षिक परीक्षा जवळ येत चालली म्हणजे मुलांच्या शिकोण्या मिळविण्यांत शाळांतील मास्तर कशा क्लृप्त्या लढवितात तें पाहण्यासारखें असतें. आमच्या आबा मास्तरांचा या बाबतींत अगदीं हातखंडा होता. त्यांच्याकडे मुलानें शिकोणी धरलंन् कीं, तो कधींहि नापास व्हावयाचा नाहीं—निदान ढकलून तरी वरच्या वर्गांत जावयाचाच असा त्यांचा लौकिक होता. याचें कारण आबा परीक्षेचे पेपर फोडीत असा त्यांच्या विषयीं लोकापवाद होता. यामुळें परीक्षेच्या अगोदर दोनचार महिने आबांच्या घरींच शाळा भरत असे म्हणाना! इतकीं मुलें शिकवणीला येत. या दिवसांत मुलांच्या शिकोण्यांत ते इतके गुंतलेले असत, कीं त्यांच्या धाकट्या मुलीचा गोड पापा घेण्यास देखील त्यांना फुरसत नसे! पण ते आपल्या जिवाची धांवपळ उगीच का करीत? जवळ जवळ दरमहा १५० रुपये ते नुसत्या शिकोण्यांवर मिळवीत.

पण हीं एवढीं मुलें यांच्याकडे सुखासुखी का येत? वर्ग चालू असतांना आबा कसा गळ टाकीत पाहा!

“ भिडे, मला तुझं धड चिन्ह दिसत नाही. तूं यंदा खात्रीनं नापास होणार. वैद्य, तूं तर अगदींच मठ्ठ. तुझ्याविषयीं बोलायलाच नको. तुझे सर्वच विषय गुळगुळीत. तूं सहावींत आलासच कसा हें मला समजत नाही. तुला चवथींतच बसविलं पाहिजे.”

झालें. वैद्य आणि भिडे वर्गांत हिरमुसलें तोंड करून बसले. मधल्या सुटींत वैद्य व भिडे समदुःखी म्हणून एके ठिकाणी एका बाकावर बसले. वैद्य भिड्याला म्हणाला, “ भिडे, तूं तर सहामाहींत सर्व विषयांत पास,

नि मी फक्त दोन विषयांत नापास आहें. मग आपण कसे रे नापास होऊं ?" भिडे म्हणाला, "मलां वाटतं मास्तरांनीं हा बहुधा शिकोणी-करतां डाव टाकला असावा." "दे टाळी—खरं रे खरं? तूं अगदीं बरोबर हेरलंस." वैद्य म्हणाला, "अरे बाबा ते आपले क्लासटीचर आहेत. केव्हांच कांटा काढतील. तेव्हां त्यांची मर्जी संभाळलीच पाहिजे."

दुसऱ्या दिवशीं ते दोघे आबा मास्तरांच्या घरीं गेले. "सर तुम्हांला वेळ होईल का ? आम्हा दोघांना तुमची शिकोणी धरायची आहे." भिडे म्हणाला. मास्तर खुषींत येऊन म्हणाले, "असं म्हणतां होय ? बरं या उद्यांपासून." "आम्ही दोघे मिळून दहा रुपये देऊं." भिडे म्हणाला. "पैशाचं काय मोठंसं, तुमचं वर्ष फुकट जाऊं नये ही खरी माझी इच्छा. तुम्ही पास झाल्यावर मी एकेकाजवळून दहा दहा घेईन. भिडयाला काय कमी आहे ? बाप नांवाजलेला वकील आहे, आणि वैद्याच्या वडिलांना तर २५० रु. पगार आहे. मी तुमच्या वडिलांजवळून भांडून पैसा घेईन. आनंदानं या उद्यांपासून."

ते दोघे आबांकडे शिकोणीला जाऊं लागले.

लगेच आठ दिवसांनीं आबा वर्गांत म्हणाले, "Mr. Bhide you are improving. I think you will pass this year. वैद्य तुझाहि बराच प्रोग्रेस झाला आहे. तूंहि यंदा सुटशील असं वाटतं. बघूं या." या वेळीं कुळकर्णी नांवाचा एक फाजील मुलगा म्हणाला, "सर, हा शिकोणीचा प्रभाव आहे वाटतं !"

## २१

चौलचे वामनराव जोशी यांची कर्मठपणाबद्दल फार प्रसिद्धि होती. सकाळीं स्नान केल्यावर ते दोन तास तरी नाक धरून बसत. त्यांचें आन्हिक आटपेपर्यंत ते सहाण नीट न धुतल्यामुळें गंध काळें आलें म्हणून, दूधवात वेळेवर दिली नाहीं म्हणून, अक्षता जास्त ठेवल्या म्हणून किंवा बेलाचीं

पानें पूजापात्रांत ठेवलीं नाहींत म्हणून रोज सुनांवर तडफडले नाहींत असें कधीं झालें नाहीं. दुर्वासाचे ते सहोदर असल्यामुळें घरांतील सर्व मंडळी त्यांच्यापुढें चळचळ कांपत. गांवांतून हे घरीं आले कीं, लहान मुलें लपंडाव खेळायला लागत! यांचे चिरंजीव अनंतराव पुण्यास असतांना जरी भांग पाडून बोडक्यानें हिंडत तरी घरीं जातांना गाईच्या पावला इतका घेरा ठेवून जात! त्यामुळें वामनराव गांवकऱ्यांना अभिमानानें सांगत कीं, 'आमचा अंतू एवढा बी. ए. झाला पण अजून हजामत करतो, छाकटया-सारखे केस ठेवीत नाहीं.' गांवांतील चार शिष्ट लोकांत ते मोडत. अर्थात् मोठेपणाचें लक्षण म्हणून ते केसरी घेत. पण त्यांतसुद्धां तिघांची भागी असे! एकदां ते व त्यांचे भागीदार केसरी वाचीत असतांना कशी मौज उडाली पहा!

नाना—आज मुख्य पानावर दोन फोटो आहेत.

आबा—कोणाचे?

नाना—डॉ. अंबेडकर व महात्मा गांधी.

माधवराव—हे डॉ. अंबेडकर कोण?

नाना—ते अस्पृश्यांचे पुढारी आहेत.

वामनराव—गांधीसुद्धां हरिजनांचे कैवारी आहेत.

नाना—पण डॉ. अंबेडकर स्वतः अस्पृश्य आहेत.

वामनराव—(बैठकीवरून टुणकन् उडी मारून) काय म्हणतां ते अस्पृश्य आहेत?

नाना—होय.

वामनराव—तर मग मला विटाळ झाला.

नाना—(हसून) अहो त्यांचा नुसता फोटो आहे. फोटोला का विटाळ आहे?

वामनराव—फोटो झाला म्हणून काय झालं? त्यांचीच ती प्रतिमा आहे. आंघोळ केलीच पाहिजे.

नाना—तुमचं सोवळं फार कडक.

वामनराव—कडक ? अहो, तेरवां मांजरीचीं पिलं मेलीं तर तीन दिवस शिवलों नाहीं मी मांजरीला. सुतक असतं ना तिला ! मग हे तर बोलून चालून अस्पृश्य !

यांच्या चिरंजिवांची अशीच एकदां चांगली फजिती उडाली. अनंतराव पुण्यास भावेस्कूलमध्यें मास्तर होते. बी. ए. होईपर्यंत ते खानावळींतच जेवत होते. गुदस्ताच त्यांचें लग्न झालें.

पण लग्न झाल्यावर लगेच त्यांस खानावळीचें अन्न मानवेनासें झालें ! म्हणून लवकरच त्यानीं पुण्यास बिऱ्हाड थाटलें. लग्न होऊन सात–आठ महिनेच झाले असल्यामुळें त्यांच्या प्रेमाचा साथीदार कोणीच नव्हता. इनमीन दोन माणसें. भर तारुण्याचा उरूस ! दोघेंहि रंगेल व हौशी ! मग तेथें सुखाच्या चोजल्यांना काय तोटा ! दोघेंजण रोज बरोबर जेवावयास बसत. बायकांनीं मात्र बॉडी, ब्लाउझ घालून जेवावयास बसावयाचें आणि पुरुषांनीं मात्र थंडीचे कुडकुडत उघडें जेवावयास काय म्हणून बसावयाचें ? म्हणून अनंतरावहि स्वेटर घालून बसत. एकदां हीं दोघें जेवावयास बसलीं असतांना व अनंतराव आपल्या लाडकीच्या पानांतील पदार्थ घेत असतांना अचानक वडील–मातोश्रींच्या स्वाऱ्या तेथें येऊन थडकल्या ! 'लेक कसा संसार करतो तें पाह्यचा लागला होता ना ध्यास. पाहा कसा चांगला संसार करतोय्, डोळे उघडून पहा. तिनं तर त्याला घेरलायन् ! चटोर पोर ! नवऱ्याला वाढून मागून गिळलन् असतन् तर मेली नसती कांहीं.' आई एकदम कडाडली !

## २२

रामभट—अग पाहिलंस कां माझ्याकडे ? जरा मान वर कर.

दुर्गाबाई—( तांदूळ निवडावयाचे थांबवून ) इश्य ! हें काय हे ! हा कुणाचा कोट घातलाय ?

रामभट—म्हणजे तुला माहीत नाही वाटतं ? मी परवा मुंबईहून आलों तेव्हां गाठोडयांत बांधलेला होता.

दुर्गाबाई—कसासाच बाई दिसतो कोट ! बाराबंडीच शोभून दिसते या अंगाला.

रामभट—हेंच तें. अगदीं अरबूज आहेस ! तुला काय त्याची चव ?

दुर्गा—पण दिला कुणी हा कोट ?

रामभट—अग आपल्या वासूनं दिलाय्.

दुर्गा—अस्सं ! भावजींनीं दिला वाटतं. बरेच उदार झाले या खेपेला ! ( जवळ जाऊन ) दोनच बटनं आहेत वाटत कोटाला ? काय तरी भावजी कंजूष ? चार-पांच बटन कां नाहीं लावलीं ? आणि म्हणे १५० रु.पगार आहे त्यांना.

रामभट—अग तो म्हणाला, 'ती फॅशन आहे.' त्याचा एक बटनीसुद्धां कोट आहे, काय ग, मीं हा कोट घातला, डोक्याला झिळमिळ्याची पगडी घातली आणि माझा चांदीच्या काडयांच्या चष्मा लावला कीं अगदीं वकिलासारखा नाहीं कां दिसायचो ?

दुर्गाबाई—इश्य ! आणि आंत सदरा नको कां घालायला ? सदरा घातल्याशिवाय कां वकील कोट घालतात ? आणि हें काय ? जुना दिसतोय तो कोट. मानेशीं फाटलाय तो !

रामभट—अग छे ! तो म्हणाला, अगदीं नवा आहे. एकदां अंगांत घालून भट्टीला दिल्यामुळें तो मानेशीं विरला आहे.

दुर्गा—तरी म्हटलं भाऊजी एवढे उदार कसे झाले ? पाप नाहीं कुणाला द्यायचे. बोहारणीला द्यायचा तो तुम्हांला दिला झालं ! बोहारी कुठले !

---

# आधुनिक राजपुत्रांचें लीलाचरित्र

## अध्याय पहिला. *

### कांहीं राजलहरी

दोन व्यक्तींत तंतोतंत साम्य सांपडणें जसें कठिण तसें दोन राजपुत्रांत सांपडणें कठिण ! कारण प्रत्येकाचा शोकनोक, रंगढंग वेगवेगळा. प्रत्येकाची लहर म्हणजे जलवीचीचीच लहर ! एकाचे पाय हिंदुस्थानच्या बाहेर कधींहि वळले नाहींत. पण राज्यव्यवस्था पहावी तर चन्द्रकलेप्रमाणें विकासी व आनंदायी. एकाची फक्त चातुर्मास्यांत घरीं राहण्याची लहर; आणि राज्यव्यवस्था पहावी तर दहा शतकें मागासलेली. एकाला सिनेमांतील नखरेबाज नटीशीं प्रेमालाप करण्याचा मोह, तर एकाला आपल्या डोळ्यांदेखत स्वतःच्या बायकोला तिच्या सख्या भावाला आलिंगन देण्याची बळजबरी करण्याची हौस व तिच्या नकारामुळें तिचा खून करण्यापर्यंत मजल ! एकाला मोटारीचा शोक अतिशय. अर्जदाराचा फोटो अर्जाबरोबर असण्याविषयीं एकाचा हट्ट. एकाला एक पत्नीव्रताची हौस तर दुसऱ्याला प्रचंड जनाना जवळ बाळगण्याची हौस. एकाचा बालविवाहावर कडक निर्बंध तर दुसऱ्याचा बालविवाह करण्याविषयीं हट्ट. एकाला सावत्र मातांची सेवा करण्याची आवड तर दुसऱ्याला त्यांचा जुना बाजार भरवण्याची लहर ! 'सब चीज छे छे आणा, कोइबी चीज उठाव' प्रमाणें आपल्या सावत्र मातांना ३०–३० रुपयांला विकण्यापर्यंत त्यांची मजल ! कांहींच्या रंगबाजीचें पर्यवसान स्त्रियांच्या गर्भपातांत ! कांहीं लग्न करण्यावर व मृत्यूवरसुद्धां कर बसवितात. थोड्यांच्याच कपाळीं 'डिग्रीचा कुंकुमतिलक' लागतो. लक्षावधि प्रजाजनांची सुखदुःखें असल्या राज्यकर्त्यांवर अवलंबून असतात.

---

* केसरी, ता. ११ मार्च १९३२.

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकस्य मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥

अशा प्रकारें प्रजेच्या सुखासाठीं अहर्निश झटणाऱ्या प्रभु रामचंद्राप्रमाणें एका तरी संस्थानिकाची राज्यसूत्रें धारण करण्याची लायकी आहे का ?

## राजपुत्रांचें बालपण.

असल्या गुणी बाळांचें बालपण कसें जातें हें जाणण्याची उत्कंठा कोणाला होणार नाहीं ? त्यांच्या बाळपणाबरोबरच त्यांच्या अनेक दुर्गुणांनाहि बाळसें येतें. राजपुत्राचें बारसें झाल्यावर युरोपियन स्त्री बहुधा तेथे टिकतच नाहीं. कारण राजवाड्यांतील कामांध पुरुषांची पापी नजर तिच्याकडे वळते. त्यांच्या गहिरी नजरांचा मारा चुकवितां चुकवितां तिला नाकीं नव येतात. शिवाय युरोपियन नर्सने निघून जाण्यांत राणीला आनंदच वाटतो. कारण गोऱ्या कातडीचा हात आपल्या बाळाला लागूं नये अशी तिची मनापासून इच्छा असते. मग मुलाचा सांभाळ करण्यासाठीं एक साधी काजळ वर्णी पण प्रेमळ दायी ती ठेवते. भावी राजाचा सांभाळ करण्यासाठीं एकहि सुंदर स्त्री न ठेवण्याची राणी होतां होईल तो खबरदारी घेते. कारण ज्या राजपुत्राला आपल्या हातांत ती खेळविते त्याच्याच हातांत आपण भावी आयुष्यांत आनंदानें खेळावे अशी तिची इच्छा असते, कारण राजाच्या नाटकशाळेंत एकदां तिचा प्रवेश झाला म्हणजे आपणाला पुत्र होण्याची तिला अनावर इच्छा होते.

राजपुत्राच्या तिसऱ्या वाढदिवशीं थाटमाट मोठा पाहाण्यासारखा असतो. या दिवशीं शाळा–कॉलेजांना व कोर्ट–कचेऱ्यांना सुटी असते. होमहवन करण्यांत दशग्रंथी ब्राम्हण गुंतलेले असतात. होमांतील ज्वाळा तुपाची धार सोडल्याबरोबर जिभल्या काढून चाटूं लागतात. सायंकाळीं मोठ्या थाटानें राजपुत्राची सोन्याच्या गाडींतून मिरवणूक निघते. त्यावेळीं प्रजाजनांच्या कृपाकटाक्षांचे नजराणे पाहून राणीला मुठभर मांस चढते.

## हें बालपणाचें शिक्षण

या महोत्सवानंतर राजपुत्राचें महत्त्व दिवसेंदिवस वाढतच जातें. त्याच्या दाई त्याच्या अंगांत तऱ्हतऱ्हेचे जरतारी कपडे व कानामध्यें हिऱ्याचे डूल घालतात. ते डोलूं लागले म्हणजे दायाहि प्रेमभरानें डोलूं लागतात. राजपुत्राला कडेवर घेऊन आकाशाकडे बोट दाखवून 'बाळराजे हा पाहिलात कां चांदोबा, हा पाहिलांत कां सूर्य, यांच्याच वंशांत आपला जन्म झाला' असें कौतुकानें सांगतात. संस्थानी अधिकाऱ्यांची मुले त्यांच्याजवळ खेळावयाला येतात. या बालगोपालांत राजकुमार क्रीडा करीत असतो. राजवाड्यांत राजपुत्र राजाच्या मांडीवर बसून समोर चाललेला नर्तकींचा थयथय नाच, त्यांचा मोहक अंगविक्षेप, त्यांचें श्रृंगाररस परिपूर्ण गाणे ऐकत असतो. बेहोश झालेले आपले वडील नर्तकीचा पाठीवर सोडलेला वेणीचा शेपटा कसा ओढतात व तिच्या ओठाशीं आपल्या ओठांची ओळख कशी करून देतात हें तो पहातच असतो. राजभाटांचें स्तुतिपाठ, विदुषक व खुषमस्करे यांचे मद्यप्राशनांचे समारंभ त्याच्या नजरेखालून जात असतात. त्यामुळें मदिरेचें आकंठपान, सुंदर युवयुवतींचे प्रेमकटाक्ष, गाण्याची मैफल वगैरे तऱ्हा म्हणजेच आयुष्य, हें झालें म्हणजे 'आयुष्याची इतिकर्तव्यता संपली अशी त्यांची समजूत होते.

## युरोपियन शिक्षकांचे पाठ

राजपुत्राच्या वयाच्या सातव्या वर्षी सरस्वतीपूजनाला सुरुवात होते. राजपुत्राच्या शिक्षणांत आईबापांप्रमाणें राजकीय खातेंहि मनापासून लक्ष घालतें. राजपुत्रानें चांगल्याच गोष्टी शिकाव्यात, वाईट शिकूं नये म्हणून हें खातें फार खबरदारी घेतें. त्याच्या शिक्षणासाठीं युरोपियन शिक्षकाची नेमणूक केलेली असते. राजकुमाराकडून तो कसे सुंदर धडे पाठ करून घेतो पहा:—

“ब्रिटिशांच्या राज्याएवढें अवाढव्य व सुखदायक राज्य अजून अवनितलावर दुसरें झालेलें नाहीं. तेथें सूर्य कधींहि मावळत नाहीं. ब्रिकेट

हा सर्व खेळांचा राजा होय. ईटनच्या क्रीडांगणावरच वॉटर्लूची लढाई जिंकली. ब्रिटिशांचे सैनिक हिंदुस्थानांत नसते तर जपान आणि रशिया हिंदुस्थानाला आपापसांत वांटून घेतां. काटकसरीच्या धोरणामुळेंच हिंदुस्थान देश वैभवसंपन्न झाला. अजून एक शतक हिंदुस्थान देश वसाहतीच्या स्वराज्याला नालायख आहे." या व्यतिरिक्त अठरा विश्वदारिद्रय हिंदुस्थान देशांत कसें नांदत आहे. बेकारीनें अक्राळ विक्राळ स्वरूप कसें धारण केलें आहे, गुणवंतांचे गुण मातीमोल कसे होत आहेत, द्रव्याचा ओघ परदेशीं कसा वाहात आहे वगैरे हिंदुस्थान देशाचीं हीन दीन स्थिति कळूं न देण्याची तो फार खबरदारी घेतो.

---

## अध्याय दुसरा *

### कॉलेजमधील शिक्षण

राजपुत्रांना उच्च शिक्षण देण्यासाठीं हिंदुस्थानांत चार स्वतंत्र कॉलेजें स्थापिलीं आहेत हें सर्वांस माहीतच आहे. प्रत्येक संस्थेच्या खर्चाचा आंकडा दरवर्षी फुगतच असतो. राजकुमारांच्या खर्चाची गोष्टच वेगळी. बोलूनचालून बडे बापके बडे बेटे ते. अशांनीं आपल्या जिवाचे चोचले करावयाचे नाहींत तर मग कोणी? राजपुत्राच्या खर्चाचा आंकडा पाहिला तर डोळे फाटून जातात. उदाहरणार्थ एका राजपुत्राला सन १९२५-२६ सालीं ३५,५०५ रुपये खर्च आला.

जेव्हां राजकुमार कॉलेजें हिंदुस्थानांत स्थापन झालीं त्यावेळीं चालकांनीं इटन आणि हॅरो येथील शाळांचें ध्येय डोळ्यांपुढें ठेविलें होतें. तेथील विद्यार्थी जसे खेळण्यांत तरबेज तसे बुद्धीनेंहि तरतरीत; पारितोषकें व

---

* **केसरी** ता. २२ मार्च १९३२.

शिष्यवृत्त्या मिळविण्यांत एकमेकांमध्यें अहमहमिका; त्यांची राहणी साधी पण विचारसरणी उच्च. येथील बऱ्याच राजपुत्रांजवळ द्रव्याचें भांडवल पुष्कळ पण अकलेचें भांडवल तुटपुंजें; शिवाय अभ्यासापेक्षां उनाडक्या करण्याकडे विशेष ओढा. तेव्हां या दोन प्रकारच्या विद्यार्थ्यांमध्यें जमीन-अस्मानाचा फरक. त्यामुळें चालकांच्या ध्येयाला मृगजळाचें स्वरूप न आलें तरच नवल !

कॉलेजांतून शिक्षण घेणाऱ्या हल्लींच्या राजपुत्रांकडे पाहा. स्वदेशाभिमानाच्या वाऱ्याला ते अर्धांगवायु समजतात, स्वाभिमानाला ते शून्याची किंमत देतात, मनाच्या मोठेपणाला ते मूर्खपणा समजतात. बंधुभावाचें नातें ते झुगारून देतात, मनगटाची कांब लोखंडाच्या कांबीसारखी कणखर न बनवितां सोन्याच्या कांबीनें आपलीं मनगटें कशीं आकर्षक होतील इकडे लक्ष देतात. सारांश, राज्यकर्त्यांच्या ठिकाणीं जे दुर्गुण नसावे तेच ते तेथें शिकतात.

## मदनाच्या लीला

शिवाय या दुर्गुणांची संख्या कमी पडते म्हणूनच कीं काय ते आणखी एका दुर्गुणाची त्यांत भर घालतात; तो दुर्गुण म्हणजे गद्धेपंचविशीचे चाळे मदनाच्या लीला. कॉलेजांत शिक्षण घेणाऱ्या सर्व राजपुत्रांनीं तारुण्याच्या प्रांतांत नुकतेंच पाऊल टाकिलेलें असतें. त्या प्रांतांतील वाट त्यांना अनोळखीची. त्यामुळें वांकडें पाऊल पडण्याची फार भीति. नीतीचें नाजूक बंधन तोडण्याकडे मनाचा साहजिक कल ! राजपुत्रांच्या सुखसोयी करण्यांत त्यांचे तेथील पालक मोठे चतुर. सकाळचा चहा घेतांना राजपुत्राला कोमल हाताचा स्पर्श होतो. आंघोळीचें पाणी उपसून दिल्यावर, बक्षिस म्हणून घंगाळांतील पाण्याला गुलाब पाणी समजून तें त्यांच्या अंगावर तो शिंपडतो. संध्याकाळीं फिरावयाला जातांना मैत्रिणीशीं चाललेले वाऱ्याचे खेळ पाहून त्याच्या प्रेमाला पालवी फुटते. तात्पर्य, मदनबाणांचा वर्षाव झाल्यावर जें

व्हावयाचें तेंच होतें. एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे अविवाहित राजपुत्रांना लग्नाच्या अगोदर बिजवराचें स्वरूप प्राप्त होतें.

या सर्व दुर्गुणांचा परिणाम त्याच्या चारित्र्यावर कळत न कळत होतो. त्यामुळें राजपदाच्या नालायकीचा छाप त्याच्या कपाळावर न मारतां आपोआप बसतो. आपण ईश्वराचेच अंश आहों व त्याच्याच प्रेरणेनें आपण हजारों लोकांवर राज्य करण्यास जन्मलों आहों असें त्यांना वाटतें. हा लक्ष्मीपुत्र सरस्वतीला अगदीं तुच्छतेनें लेखतो. स्वतःच्या ऐषआरामांत हा निमग्न असतो. आपलें राज्य म्हणजे स्वतःची खासगी मिळकत अशी त्याची वेडगळ समजूत असते. आपले प्रजाजन म्हणजे निव्वळ गुलाम. यांनीं आमच्या ओंजळीनें पाणी प्यायलाच पाहिजे असा यांचा हट्ट. ‘ प्रजाजनांचे हक्क ’ असे शब्द कानीं पडले कीं, याच्या कपाळाला आठया पडतात. प्रजाजनांचा पुढारी पाहिला कीं, याच्या तळपायाची आग मस्तकाला पोंचते. जनतेच्या हक्कांची लाट उसळली कीं, याला धरणीकंपाचे धक्के बसल्याप्रमाणें होतें. सारांश, राज्याभिषेक झाल्यावर त्याची वृत्ति पूर्णपणें अरेरावी बनते.

## राणीचें वैवाहिक सुख

राजपुत्रांच्या आयुष्यांत चिरस्मरणीय प्रसंग अनेक असतात. अशाच प्रसंगांपैकीं राजपुत्राचा विवाह हा एक होय. राजाची राणी कशी असणार हें न सांगतांहि कळण्यासारखें आहे. ती रूपसंपन्न असणार हें उघड आहे. राजाची राणी होणाऱ्या मुलीला भाग्यवान कोण म्हणणार नाहीं ? तिचा हेवा कोणती स्त्री करणार नाहीं ? कुबेरासारखें संपन्न स्थळ मिळाल्यावर तिला कोणती उणीव भासणार ?

लग्न झाल्यावर किती गोड विचार तिच्या मनांत येत असतील ? आज मी केवढया उच्च पदाला पोंचलें आहे ! ‘ तिकडचें ’ माझ्यावर किती अलोट प्रेम ! तिकडचें चालणें, बोलणें, हंसणें किती मनोहर व विनयशील.

क्षणभर मी दृष्टीआड झालें तर कोण मनाची हुरहुर ! मला नेण्याविषयीं माहेरचें पत्र आलें म्हणजे पाठविण्याविषयीं कोण आढेवेढे ! निरनिराळे दागदागिने स्वत: हातानें घालण्याचा काय मोह ! आज अमका शालू नेस, उद्यां तमकें पातळ नेस, आज अशी वेणी घाल; उद्यां तो मोत्यांचा हार घाल; रोज नवे नवे हट्ट ! खरोखर असा पति मिळण्याला सात जन्म पुण्य करावें लागतें.

पण हळूहळू तिकडची प्रेमळ नजर गढूळ झाली कीं तिच्या पोटांत कालवायला लागतें. संशयाचें जाळें ती विणूं लागते. स्त्रियांचा नैसर्गिक दोष जो मत्सर तो जागृत होतो. " आज चार दिवस झाले, राजवाड्यांत असूनसुद्धां माझ्याशीं क्षणभर बसावयाला फुरसत नाहीं. मग प्रेमाचे दोन शब्द बोलावयाचें बाजूलाच राहो. एखादेवेळीं सहज नजरानजर झाली तर जातांना ' जेवण झालें का ? ' हेच काय ते ओझरते शब्द ! काय बाई तरी राग ! पण तिकडे रागवावयाला मी तरी काय असा अपराध केला आहे ? कांहीं म्हणतां कांहीं सुद्धां नाहीं. बरें, काम म्हणावें तर यांना कसलें आलें आहे काम ? सहीसुद्धां करावयाला त्रास पडूं नये म्हणून सहीचा शिक्काहि करून घेतला आहे. मग कसलें बाई काम ? हो, बरोबर " कामाचें काम ! "

## राजाचें फुलपांखरासारखें प्रेम

" इतके दिवस मला वाटत होतें कीं राजवाड्यांतील हा घोळका यांच्या नातलगांचा आहे म्हणून, या माझ्या लांबच्या जावानणंदा देखण्या पाहून मला आनंद वाटला; पण आतां पाहातों तों काय साराच प्रकार वेगळा. यांच्याशीं जर आपलें एवढें मेतकूट आहे तर माझ्याशीं लग्न करून उगीच प्रेमाचें ' थालीपीठ ' कशाला केलें ?

" त्या नाचऱ्या पोरीशीं कोण हा लघळपणा ! ज्यानें त्यानें आपल्या पायरीनें नको का वागायला ? मेल्यांनो ! नाचत नाचत तिकडच्या जवळ काय जातात, पाठ थोपटून काय घेतात, डोळे किलकिले काय करतात,

एक ना दोन; बोलण्यापेक्षां गप्प बसलेलें बरें. त्या ×× नीं बोलूनचालून आपल्या सौन्दर्याचा विक्रय मांडला आहे. पण 'इकडे' नको का कांहीं आळाबांधा घालावयाला? मीं नुसतें सहज बोललें तों काय माझ्यावर गहजब! काय म्हणे संशयीच तूं! उगाच कुभांड रचतेस माझ्यावर! आठ आठ दिवस स्वारीला सोडून निमूटपणें सुस्कारे टाकीत बसावें!"

अशा प्रकारें राण्यांची स्थिति पाहिली म्हणजे कोणाला त्यांच्याविषयीं कींव येणार नाहीं? सामान्य स्त्रिया घेतल्या तर त्यांना स्वप्नांतसुद्धां सवतीच्या पदराचा वाराहि सहन होत नाहीं. पण येथल्या अनेक सवतींच्या पदरांच्या वाऱ्यांनीं राणीचा जीव घाबरून नाहीं का जाणार? तो जाऊं नये म्हणूनच कीं काय हल्लींचे राजे युरोपियन स्त्रियांच्या गळयांत ग ा घालतात; कारण आंग्ल युवतींच्या झग्यांना पदर नसतो हें सांगावयास नकोच!

राजाच्या उल्लू प्रेमाला उपमा द्यावयाची तर ती फुलपांखरांची. फुलपांखरांचें सर्व जीवन फुलांवर. मनांत यावयाचा अवकाश; क्षणांत या फुलावरून त्या फुलावर झालीच त्यांची सफर; एवढी चंचल वृत्ति! राजाचें जीवनरहस्य कशांत? तर विषयी प्रेमांत! चालतींबोलतीं सुंदर फुलें जवळ ठेवण्याचा राजाला फार शोक. नवीन सुंदर फूल दिसलें कीं तें मिळविण्याचा कोण अट्टाहास! राजाच्या प्रेमाचें वैशिष्टय कशांत तर तें थिल्लरपणांत. आज एकीच्या गळयांत गळा घालतील, तर उद्यां तिचा केसानें गळा कापतील! केव्हां मर्जीचा पापड वांकडा होईल कांहीं नेम नाहीं.

## राजाचा झनानखाना

राजाच्या झनान्याकडे जरा नजर फेका. केवढा घोळकाच्या घोळका तुम्हांला तेथें दिसेल. त्यांची मोजदाद करतांना आठवण झालीच तर अंगावरील लोमांचीच! किंबहुना त्यांची सुद्धां संख्या कमी भरेल. कारण प्रत्येक बोटीला यांचें 'फॉरेन पार्सल' न आलें तरच नवल! शिवाय रोजची डाक येते ती निराळीच!

पुष्कळांना ही अतिशयोक्ति वाटेल, पण तसें वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण या कामगिरीवर राजाची मुळीं पगारी मंडळीच ठेवलेली असतात. आणि कामगिरी फत्ते झाली म्हणजे त्यांची बढती झालीच म्हणून समजा. मग शाळामास्तरचा मुख्य कारभारी होतो. उमेदवाराचा मुनसफ होतो किंवा कारकुनाचा फडणीस होतो. किंबहुना ही कामगिरी बजावून वरिष्ठ जागा मिळविण्यांत एकमेकांत अहमहमिका सुरू होते.

बरें, एवढया स्त्रियांचा आयुष्यक्रम सुखी तरी ! नांव नको ! त्यांचें शरीर जरी सुखशय्येवर लोळत असलें तरी प्रेमळ जीव उन्हांत तळतळतच असतो. कारण विरहाचे चटके त्यांना बसत असतात. नवीन भरती झाली कीं त्यांच्या पोटांत धस्स होतें ! आपल्यावरची मर्जी उडाली असेंच त्या समजतात. घरांत जिन्नस नसला व गरज भासूं लागली म्हणजेच आपण बाजारांतून तो विकत आणतों. तोच दाखला येथें लागू.

या प्रेमाच्या पेठेंत रोज रोज जी नवीं माणसें येतात तीं स्वखुषीनें का येतात ? कांहींना भूल देऊन, कांहींना भुलथापा देऊन, तर कांहींच्या तोंडांत बोळे घालून त्यांना पळवून आणतात, आणि या संकटांत सांपडलेल्या पतिव्रता कशा राजाला बधतील ? राजाची प्रेमयाचना तिनें झिडकारली कीं तिचा अमानुष छळ सुरू होतो. त्यांच्या भेसूर किंकाळ्या ऐकल्या म्हणजे अंगावर शहारेच येतात. कोणाच्या अंगभर सुया टोचतात तर कोणाच्या डोळ्यांत तिखट घालतात. कोणाच्या दुग्धाची धार येणाऱ्या स्तनावर सुरीची धार चालवतात तर कोणाचें नाक कापतात.

आणि हे सर्व आसुरी प्रयोग कशाकरितां ? तर राजाची पाशवी इच्छा तृप्त होण्याकरितां ! पतिव्रतांचें शील भ्रष्ट करण्याचें कंकण बांधलेल्या राजाला केव्हां बंधन घालावयाचें ? मुठींत प्राण धरून बसलेल्या आपल्या भगिनींना कोणी सोडवावयाचें ?

---

# अध्याय ३ रा. *

राज्याभिषेक, पुत्रजन्मोत्सव, व्हाइसरायची भेट वगैरे प्रत्येक संस्थानांत घडणारे समारंभ सुवर्णाक्षरांनीं कोरून ठेवण्यासारखे असतात. अशा प्रसंगी राजवैभवाचा दिमाख पाहण्यासारखा असतो. मेजवान्यांचा थाटमाट मदिरेचें आकंठपान, पाहुण्यांचे मानपान, कलावंतिणींचे नाच, विजेचा लखलखाट यांनीं संस्थानी वातावरण दुमदुमून जातें. आणि हें कशाकरितां तर चार दिवस प्रजाजनांचे सुखसोहाळ्यांत जावे म्हणून ! काय म्हणे अन्नान्नदशेला पोंचलेल्या प्रजेला चार दिवस पंचपक्वान्नांचें भोजन मिळावें म्हणून असे प्रसंग आम्हीं मुद्दाम घडवितों. पण प्रजेच्या अंगाचे लचके तोडूनच ना ? काय म्हणे गायन–नृत्यकलांना राजाश्रय मिळावा म्हणून आम्ही नाचरंग करतों. पण लक्षावधि रुपयांचा हा आहेर म्हणजे कलेला प्रोत्साहन का दुर्गुणांना आमंत्रण ? काय म्हणे खाशा पाहुणे मंडळीचे डोळे दिपावे म्हणून विजेचा लखलखाट; पण अशा प्रसंगीं प्रजेचे डोळे दिपतात कां डोळे येतात, कां त्यांना रातंदळ लागतें ?

संस्थानिकांच्या डोळ्यांवर संपत्तीचा धूर आला असला तरी या धुराच्या लोळांनीं प्रजेच्या डोळ्यांना पाणी येतें; एवढेंच नव्हे, तर प्रजा गुदमरून जाते. केव्हां एकदां आपणाला स्वातंत्र्याची शुद्ध हवा मिळते असें तिला होऊन जातें; असले समारंभ आले कीं प्रजेच्या पोटांत धोंडच उभी राहते. कारण तिच्या पैशाचीं अवाढव्य कराच्या रूपानें दिवाळीं काढूनच राजा आपल्या दिवाळ्या साजऱ्या करतो. अशा प्रसंगीं हस्तनक्षत्राच्या पावसाप्रमाणें खर्चाच्या पैशाचा पाऊस पडतो व ज्यांच्या पैशावर सरकार हे समारंभ साजरे करतें त्या प्रजाजनांचीं तोंडें वर्षाकालीन मेघांप्रमाणें काळजीनें काळवंडलेलीं असतात.

---

* **केसरी** ता. २५ मार्च १९३२.

अशा प्रसंगीं सरकारच्या बजेटमध्येंहि फिरवाफिरव होते. दारुकामाला पैसे पाहिजेतना, फिरवा आरोग्यखात्यावर वक्र दृष्टि; नवीन हत्ती विकत आणावयाचे आहेत ना, लावा शिक्षणखात्याला हरताळ; हजारों रुपये खर्च करून शिकारी कुत्रे विकत घ्यावयाचे आहेतना, द्या नोकरीवर असलेल्यांना भाकरीचे तुकडे ? व्हाइसरॉयांकरितां दोन लाखांचा नवा राजवाडा बांधावयाचा आहेना, करा सध्यां इतर इमारतीचें काम तहकूब. एक ना दोन काटकसरीची कातर लावून असले समारंभ साजरे होतात खरे. पण या कातरीनें राज्यव्यवस्थेच्या वस्त्राच्या चिंध्या होतात याची काय वाट ? कारण या चिंध्या ओघानेंच प्रजेच्या अंगावर दिसतात. प्रजेच्या अंगावर या लक्तऱ्या पाहिल्या म्हणजे कोणाला उद्वेग येणार नाही ? खरें पाहतां प्रजा ही राजाला स्वतःच्या मुलांच्या ठिकाणीं, तेव्हां तिच्या तोंडांत मोठ्या प्रेमानें सुखाचा घास घालावयाचा. पण तें बाजुलाच राहून तिच्या तोंडातील घास काढण्याची याची वृत्ति, अशा जुलमी राजाला कोणती उपमा द्यावी तेंच कळत नाहीं. शनीसारखा क्रूर ग्रह सुद्धां आपला रास सोडतो. पण प्रजेला असंतोषी ठेवण्याचें व्रत राजा कधींहि सोडत नाहीं.

नवीन छोटा बडा लाट हिंदुस्थानांत आला आणि त्याचा फेरफटका मोठ्या संस्थानांत झाला नाही असें कधीं झालें आहे का ? नवीन व्हाइसरॉय हिंदुस्थानांत यावयाचाच, तो संस्थानांत जावयाचाच; व तेथून तो जातांना आहेर घेऊन पण अंतस्थिति हेरून जावयाचाच हें अगदीं ठरून गेल्यासारखेच आहे. संस्थानांना व्हाइसरॉय भेट देतो तीं मुख्यतः राज्यव्यवस्थेची नाडी तपासण्याला, असें सकृद्दर्शनीं सर्वांना वाटतें, पण व्हाइसरॉयाच्या काय किंवा गव्हर्नराच्या काय आपण संस्थानची पाहणी करावयास जात आहों हें ध्यानींमनीं सुद्धां नसते. सासरहून माहेरीं जातांना मुलगी कामाचें गाठोडें खुंटीला टांगून ठेविते. तशी हे कामाची चोपडी बॅगमध्यें घालून ठेवितात. सासरच्या कामाला कंटाळून मुलगी माहेरीं चार दिवस

हसण्याखिदळण्यांत घालविते. तसे हे श्रमपरिहारार्थ संस्थानांत पाय लांब करतात. आणि याची खात्री पटवायला दुसरी तिसरीकडे जावयाला नको. त्यांचे तेथील कार्यक्रम पहा म्हणजे तेव्हांच उमज पडेल. बागेमध्यें मोठ्या थाटाची मेजवानी झाली; शिकारीचा शोक पुरा झाला आणि एकदां संस्थानची राज्यव्यवस्था प्रगतिपर व प्रजेला आनंददायी आहे असा अभिप्राय दिला, कीं खेळ खलास!

पाहूणे मंडळी यावयाची असली म्हणजे सकाळीं उठल्यापासून बायकांची धांदल उडते. आज भाजी कोणती करूं, चटणी कोणती करूं, म्हणून बायकांत कुजबुज सुरू होते तर ओटीवर लोड कोठे ठेवूं, गालिचा कसा आंथरू म्हणून घरच्या मालकाची धांदल उडेत. अंगणें साफ करण्याची व सारवण्याची गड्यांची धांदल उडतें. सारांश पाहुणे-मंडळींना आपलें घर पाहून समाधान कसें होईल ही सर्वांची इच्छा. कोणी पाहुणा यावयाचा असल्यास सामान्य लोकांत ही धांदल. मग व्हाइसरॉयासारखा बडा पाहुणा यावयाचा असल्यावर संस्थानात कोण धांदल उडत असेल कांहीं विचारूं नका. महिना महिना स्वागताची तयारी चालू. भालदारचोपदारापासून तों थेट राजाराणीपर्यंत सर्वांना आपण व्हाइसरॉयाच्या नजरेत कसे भरूं याविषयीं काळजी. मुलगी दाखवायला आणली म्हणजे ती जशी नटून थटून येते तशी ही मंडळी नटून थटून येतात. अर्थात् मुलीच्या नाकांतील मोठी थोरली नथ, हातांतील गोटतोडे, कानांतील मोठा कुड्यांचा जोड किंवा गळ्यांतील चंद्रहार हे तिचे स्वतःचे नसतात. ती शोभेसाठीं कोणाचे तरी घालते. तसेंच संस्थानांत. सुनमुखाच्या दिवशीं मुलीच्या अंगावर पोतपेट्यासुद्धां दागिने पाहून मुलीच्या आईला मूठभर मांस चढतें; पण दुसऱ्या खेपेला मुलगी माहेरीं आल्यावर तिचे खरे दागिने किती हें न सांगतांहि कळतें. तोच प्रकार येथें. पाहुणा स्टेशनवर उतरल्यावर राजेरजवाडे त्यांचें मोठ्या थाटानें स्वागत करितात.

हारतुरे घातल्यावर स्वारी सोन्याच्या पत्र्याच्या गाडींत बसते. मागाहून श्रीमंतांची स्वारी तशाच गाडींत निघते. शरदऋतूंतील प्रसन्न सृष्टिसुंदरी-प्रमाणें राजमार्गाच्या दुतर्फा बागबगीच्यांतील हसरीं फुलें विनयानें माना डोलवून स्वागत करतात. आपला राहण्याचा बंगला दुरून पाहिल्या-वर व्हाइसरॉयाला तो झोपडीसारखा वाटतो. पण जवळ गेल्यावर त्या भव्य राजवाड्याचें कलाकौशल्य पाहून तो तोंडांत बोट घालतो. राज-वाडयांत सर्व तऱ्हेच्या सुखसोयी असतात. तेथील स्नानगृह पाहिलें तर पहिल्या प्रथम बॉलरूमचाच भास होतो. तेथील कारंजांचा लहरी स्वभाव कांहीं विचारूं नका ! श्रावण मांसांत पावसाची सर केव्हां येईल याचा नेम नसतो. कारंजांतील जलधारा केव्हां अंगावर बागडतील याचाहि नेम नसतो. त्या जलधारा—त्या जणुकाय शुध्द रजताच्या तारा—अंगावर खेळू लागल्या म्हणजे ‘ अंगें भिजलीं जलधारांनीं ’ या मृच्छकटिकांतील पदाची आठवण कोणाला होणार नाहीं ? व्हाइसरॉय राजदरबारांत प्रवेश करतो तो दरबाराचा दिवाणखाना हजारों रुपये खर्च करून शृंगारलेला असतो. व्हाइसरॉयांची स्वारी द्वारप्रवेश करते तेव्हां पहिल्या प्रथम तोफांची सलामी होते; त्यांचवेळीं मखमलीच्या झुली व सुवर्ण मोहरा गळयांत घातलेले हत्ती सोंडा वर करून व्हाइसरॉयला सलाम करतात. भालदार—चोपदारांपासून सर्व मानकरी मंडळी उंची वस्त्रें परिधान करून व्हाइसरायाकडे सस्मित मुद्रेनें पाहात असतात. दरबारांत व्हाइसरॉय व सरकारस्वारी सोन्याच्या खुर्चीवर बसतात. मग कलावंतिणीचें नाचकाम सुरू होतें. तें संपल्यावर व्हाइसरायांच्या पायाजवळ सोन्याचें ताट एक नोकर ठेवितो व सरकारस्वारी विनयशीलपणें या नजराण्याचा स्वीकार करण्यास विनंति करते. मग सोन्याच्या फुलांनीं गुंफलेले हार घातल्यावर हा समारंभ संपतो.

व्हाइसरॉयाला शिकारीचा फार शोक. विशेषतः त्यांना वाघाची शिकार करण्याची फार हौस. पण ती साधली नाहीं तर त्यांस दोष कोण देणार ?

ते नेम मारतांना चुकले असें कोण म्हणणार ? नेम मारतांना त्यांना त्या वाघाची दया आली असेंच सर्वजण म्हणणार ! मग दुधाची तहान ताकावर भागविण्यासाठीं ते आपलें कौशल्य पक्षांची शिकार करण्यांत दाखवितात. शिकारीच्या शोकाप्रमाणेंच व्हाइसरॉयांना मासे मारण्याची फार आवड. आणि ते पकडण्यांत त्यांचें कौशल्य काय वर्णन करावें ? अवघ्या आठ दिवसांत एका व्हाइसरॉयांनीं वीस मासे पकडले ! आणि हे मासे पकडण्याला संस्थानला खर्च किती आला ? तर म्हणे रुपये वीस हजार !

अशा समारंभाच्या वेळीं राज्यव्यवस्थेची सर्व कामें बंद ठेवितात. सर्व खात्यांचे मुख्याधिकारी व इतर लहानसहान सर्व अधिकारी समारंभाची तयारी करण्यांत गर्क असतात. शाळा, कॉलेजें, कोर्टें, कचेऱ्या सुद्धां या दिवसांत बंद असतात ! आणि ते अधिकारी त्या इमारतींतुन आलेल्या पाहुणे–मंडळीची राहण्याची व्यवस्था करतात. निरनिराळ्या संस्थानिकांना व इतर बड्या पाहुण्यांना आमंत्रण देण्याकरतां सरकारी अधिकारी निरनिराळ्या ठिकाणीं दौऱ्यावर असतात.

या दिवसांत दारुचीं पिंपेच्या पिंपे येऊन थडकतात तीं पाहून दारूबाजीनें झिंगलेले लोक आनंदांत गाऊं लागतात. दूरदूरच्या कलावंतिणीचे थवेच्याथवे तेथें जमतात आणि आपल्या जादुगार डोळ्यानीं लोकांना भुलवितात. त्या आल्यावर कित्येक पतिव्रतांच्या गळयांतील मंगळसूत्रांतील मण्यांना तडे जातात !

सारांश, या दिवसांत लक्षावधि रुपयांचा चुराडा होतो. रेचक घेतल्याप्रमाणें सरकारचा खजिना साफ धुवून निघतो. पाहुण्यांचें उखळ पांढरें होतें. त्यांच्या उदरीं शनिग्रह येतो. प्रजेला मात्र असले प्रसंग शेंडेनक्षत्राप्रमाणें भयसूचक वाटतात. धरणीकंपाच्या धक्क्याप्रमाणें प्रजाजनांची केविलवाणी स्थिति होते.

---

# समाप्तीचा अध्याय. *

एक काळ असा होता कीं, त्यावेळीं कोणाहि संस्थानिकाला हिंदुस्थान सरकारची परवानगी घेतल्याशिवाय संस्थानची हद्द सोडतां येत नव्हती. पण महायुद्धानंतर यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें सर्व स्थिति पालटली, वसंत-ऋतूंत बहूतेक संस्थानिक स्वदेशाची हद्द सोडून थेट युरोपची हवा खातात. कारण तेथें गेल्यावरच त्यांच्या प्रेमाला पालवी फुटते. मलयपर्वतापासून वहाणारे वारें त्याना उष्ण लागत नसतील ना ?

युरोपला जाण्याचीं कारणें अनेक. एक तर कलकत्याला रेस खेळल्यामुळें, एक आठवडा दिल्लींत ' प्रिन्सेस वुइक ' करितां खर्च केल्यामुळें व स्पेशल ट्रेन मधून प्रवास केल्यामुळें त्यांना शीण येणे साहजिकच आहे. तेव्हां तो शीण घालविण्यासाठीं लंडनची सफर ! ती सुध्दां एकदोन महिने नसून चांगली नऊ महिने ! ताजी हवा यासारखा दुसरा दवा नाहीं. त्याप्रमाणें विलायतची हवा यासारखा दुसरा दवा नाहीं.

---

* **केसरी** ता. १ एप्रिल १९३२.

[ या लेखांतील उतारे सर्वस्वी एका उत्तर–हिंदुस्थानवासी ग्रंथ-काराच्या ग्रंथांतून घेतले आहेत. आणि या उताऱ्यांत ज्यांना अनुलक्षून कांहीं लिहिलें आहे ते संस्थानिकहि उत्तर–हिंदुस्थानांतीलच आहेत. इकडील संस्थानिकांसंबंधानें या ग्रंथकाराला माहिती असण्याचा संभव नाहीं. सामान्यतः महाराष्ट्रांतील संस्थानिक उत्तर हिंदुस्थानांतील संस्था-निकांच्या मानानें कमी जुलमी, कमी व्यसनी, व कमी तऱ्हेववाईक आहेत, याविषयीं पुष्कळ लोकांचें एकमत आहे. आणि उत्तर हिंदु-स्थानांतील संस्थानिकांपैकीं झाले तरी सर्वच नांवें ठेवण्यासारखे असतात असेंहि नाहीं. अर्थात् या लेखांतील हकीगत हयात किंवा मयत अशाहि कांहीं निवडक संस्थानिक व्यक्तींसंबंधानें असणार; व ती मात्र ग्रंथकारानें

एक वर्षांत जर चार आश्रम कल्पिले तर सन्यासाश्रमाचा काळ ते हिंदुस्थानांत घालवितात. कारण सन्याशाला जशी घरादाराची व बायकापोरांची पर्वा नसते. तशी यांना आपल्या संस्थानाविषयीं नसते.

तुम्ही कोणत्याहि संस्थानांत केव्हांहि जा; प्रायः तुम्हाला सरकारस्वारी तेथें दिसावयाची नाहींच. सौख्याच्या माहेरघरी त्यांचें राहणें; लंडनमध्यें जा, पॅरिसमध्यें जा किंवा कोणत्याहि विलासी ठिकाणीं जा, तुम्हांला संस्थानिकांच्या स्वाऱ्या न दिसल्या तरच आश्चर्य. सिनेमा–नाटकगृहांत जशी प्रेक्षकांची गर्दी, तशी संस्थानिकांची अशा ठिकाणीं गर्दी. प्रजेच्या जिवावरच ते तेथें उडया मारतात ! तेथें गेल्यावर चैनबाजीचे सर्व डोहाळे त्यांना आठवतात. लंडनमध्यें काय किंवा पॅरिसमधें काय सडे जाण्याचा त्यांना अति कंटाळा. श्रीमंतांच्या लग्नांत अक्षतेच्या वेळीं जसा स्त्री–पुरुषांचा घोळका दृष्टीस पडतो, तसा लवाजमा घेऊन ते इंग्लंडला जातात.

लंडनला गेल्यावर ते एका ऐटबाज विश्रांतिगृहांत उतरतात. कोणीहि संस्थानिक एखाद्या दुकानांत गेला म्हणजे दुकानदाराचा आनंद गगनांत

---

खोल माहिती मिळवून लिहिलेली दिसते. त्याला व्यक्तींचीं नांवें प्रसिद्ध करतां येत नाहींत म्हणून त्यानें प्रिन्स, राजा, राजपुत्र असें जातिसामान्य नांव घेऊन लिहिलेलें आहे. परंतु त्यामुळें सर्वच राजे किंवा संस्थानिक या उताऱ्यांत दर्शविलेल्या दुर्गुणांनीं दूषित आहेत असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. अशा प्रकारची सावधगिरीची विशेष सूचना दिली नाही तर ग्रंथकाराविषयीं गैरसमज होण्याचा संभव आहे. म्हणूनच ती दिली आहे. जुन्या संस्कृत वाङ्मयांत दण्डीचा 'दशकुमार चरित्' हा ग्रंथ सुप्रसिद्धच आहे. प्रस्तुत लेखमालेंत दिलेली मनोरंजक माहिती वाचणाराला त्यानें दशकुमारचरित्र वाचलें असल्यास त्याची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं किंबहुना हें साम्य लक्षांत आल्यामुळेंच हे लेख द्यावेसें वाटलें. ] सं. के.

मावेनासा होतो. कारण त्याची त्या दिवसासारखी विक्री फार दिवसांत झालेली नसते.

घोड्याच्या शर्यती व जुगार खेळण्याचा संस्थानिकांना अति छन्द. हजारों रुपये ते त्यांत घालवितात. कांहीं संस्थानिक स्वतःकरितां उमदे घोडे खरेदी करतात. परवा एका संस्थानिकानें दहा लाख फ्रँक अवघ्या दोन तासांत जुगारींत घालविले. तिसऱ्यानें अवघ्या तीन आठवड्यांत युरोपियन युवतींवर ६००० पौन्ड खर्च करून आपला शोक पुरा केला. कांहीं हौशी संस्थानिक आपल्या स्वतःच्या खर्चानें हिंदुस्थानांतून क्रिकेट व पोलो टीम घेऊन इंग्लंडला जातात व तेथें हजारो रुपये खर्च करतात. एवढेंच नव्हे तर २५–२५ वेळां युरोपच्या यात्रा करतात.

कांहीं इंग्लंडला आपला मायदेश समजून स्वतःची खाजगी इस्टेट तेथें करतात. लाखलाख रुपये खर्च करून हरतऱ्हेच्या मोटारी खरेदी करतात; सारांश, ज्वालामुखी पर्वताप्रमाणें प्रजेच्या अन्तःकरणाला दुःखाचे चटके लागत असतात. त्यामुळें ती सारखी कण्हत असते. पण तिकडे थंड हवेंत त्यांचे मायबाप मात्र आनंदसागरांत डुंबत असतात !

---

# लोकप्रियतेची देणगी

आयत्या वेळच्या विषयाची तयारी म्हणजे नुसती कोटटोपीची तयारी. ह्यावेळीं मला खेडेगावांतील लग्नाची आठवण होते. खेडेगावांत मुलाचे वडील मुलगी पसंत करतात. मुलगा कितीहि शिकला असला, तरी मुलाचें बहुधा कांहींच चालत नाहीं. कारण बाळबोध वळण! त्यामुळें लग्ना-पूर्वी वधूवरांची कधींच गांठ पडत नाही. त्यांची पहिली नजरानजर बोहोल्यावर! त्यांच्यासारखीच आज माझी स्थिति झाली आहे. आज येथें प्रोफेसर्सनी (परीक्षकांनी) आम्हांस मुली पसंत करून ठेविल्या आहेत. त्या गोषांत आहेत! त्यांची आमची ओळख व्यासपीठावर चढतांना होते. बोलून चालून सोरट ते! त्यांतील एक मुलगी मी न पाहातां पसंत केली!

आतां अशा वधूशीं माझा संसार आनंदी होईल कां घटस्फोट करण्याची पाळी येईल हें थोडयाच वेळांत कळेल. असो मला मिळालेला विषय 'लोकप्रियतेची देणगी' असा आहे. मला हवा असाच विषय मिळाला आहे. लोकप्रियतेची देणगी हा विषय जन्मल्यापासूनच लोकप्रिय झाला आहे. कारण सुरुवातीपासूनच आपली हसतां हसतां मुरकुंडी वळत आहे.

तरुणपणीं लोकप्रिय होण्याचें मुख्य ठिकाण म्हणजे कॉलेज. येथेंच कांही व्यक्ती लोकप्रिय होऊं इच्छितात. वर्गांत उशीरा येणे व सर्वांच्या नजरेंत भरणे, विचित्र पोषाख करणे, मुलींच्या बाकावरती लिहून ठेवणे, मुलींच्यापुढें भालदार चोपदाराप्रमाणें उभें रहाणे, स्कॉलरशीं अथवा गुणी माणसाशीं मैत्री करणे, वार्षिक चढाओढीच्या वेळीं आपल्या नांवानें बक्षिस ठेवणे, कवीच्या कविता गायनाचे वेळीं 'अमकीच कविता म्हणा' असें कागदावर लिहून सदर कवीस भरसभेमध्यें देणे, निवड-

णुकीला उभे रहाणे, सुंदर मुलीवर प्रेम करणे, नाटकांत काम करणे तपकीर अगर चंची बाळगणे, इत्यादि अनेक मार्गांनी कॉलेजांतील मुलें लोकप्रिय होतात. आणि ही लोकप्रिय होण्याची एवढी धडपड कशासाठीं ? तर आपणांकडे कॉलेजकन्यकांनी डोळे भरून पाहिलें, मागे वळून पाहिलें, स्मितवदन केलें, म्हणजे या तरुणांना २० रुपये खर्चून सूट केल्याचें सार्थक झाल्यासारखें वाटतें. कारण नदीचा उगम पर्वतांतून होत असला तरी प्रेमाचा उगम सुंदर नयनांतूनच होत असतो. प्रेमाची चोरटी चाहूल नयनांतील कृष्णबाहुल्याच जाणूं शकतात. प्रियकर दृष्टिपथांत आल्यावर नयनांतील कृष्ण बाहुल्यांची व पदराची नाजूक हालचाल एकदमच सुरू होते. त्या कृष्ण बाहुलीच्या 'कृष्ण' लीला सुरू झाल्यावर कोण मोहून जाणार नाही ? कारण पुरुषाची गति व मति कुंठित करण्याचें सामर्थ्य फक्त स्त्रियांच्या नेत्रकटाक्षांतच असते. या नेत्रकटाक्षांचा वर्षाव आपणांवर झाला म्हणजे आपण लोकप्रिय झालों असें कॉलेजांतील कित्येक तरुणांना वाटत असतें.

असले तरुण लोकप्रिय होण्याच्या संधीची वाटच पाहात असतात. आतां हेंच परवाचें ताजें उदाहरण घ्या; आमच्या एका कवि मित्रानें 'Inter logic' च्या मुलांच्या संमेलनप्रसंगीं कांही स्वतःच्या कविता म्हणून दाखविल्या. खरें पाहातां तें तर्कशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचे संमेलन ! पण नकला, फिडलवादन, गायन इत्यादि भावनांना आनंद देणारेच प्रकार चालले होते ! कारण भावनेलाच जास्त महत्त्व आहे. एखादी मुलगी 'माझें त्या मुलावर तार्किक प्रेम आहे' असें म्हणाली तर हसूं नाही कां येणार ? फार तर प्रेमाचा तर्क करतां येईल. असो, यावेळीं आमच्या मित्रानें म्हटलेल्या कविता कोणास आवडल्या नाहीत. सर्व मंडळी चेष्टा करूं लागली. मीहि हसलों. कारण त्यानें स्वतःचें हंसें करून घेतलें. तसें पाहिलें तर हा बी. ए. च्या वर्गांतील विद्यार्थी. यानें

'इंटर' च्या विद्यार्थ्यांच्या संमेलनाला जावें कां व हंसे करून घ्यावें कां ? पण न गेलें तर लोकप्रिय होण्याची संधि जाईल ना ?

गटारांत पडलेला मनुष्यहि लोकप्रिय होण्याची संधि दवडत नाहीं. किंबहुना त्याला लोकप्रिय करण्याची संधि लोक दवडीत नाहींत. असल्या प्रकारची लोकप्रियता संपादन करणारांची गणना विदूषकांतच केली जाते हें उघड आहे.

एखाद्या संस्थेला देणगी दिली कीं लोकप्रियतेची देणगी मिळते असें देणारांस वाटतें. एखाद्या संशोधक मंडळाचा आजन्म सभासद होणे, अमक्या उत्तेजक सभेचे आश्रयदाते होणे, तमक्या निवारक सभेचे वर्गणीदार होणे इत्यादि "होणे" होऊन लोकप्रियता वाढते असें पुष्कळ लोकांना वाटतें.

यांच्या या बाहेरच्या लोकप्रियतेच्या पायीं घरांतील माणसांना मात्र खस्ता खाव्या लागतात. कारण प्रत्येक गोष्टीला यांची कपातीची कातर लागलेली असते. मुलांनी 'बाबा आम्हाला अमूक आणा, किंवा पत्नीनं लाडिकपणानं मला अमक्या तऱ्हेचं लुगडं आणा' असें म्हटल्यावर लगेच ते वाघासारखे त्यांच्या अंगावर तुटून पडतील. 'तुम्हाला काय होत आहे चैन करायला ? मला अजून तीन चार संस्थांच्या वर्गण्या द्यावयाच्या आहेत ! यंदा ठेवणींतल्या लुगड्यांवरच भागवा. विकत घ्यायला सवड नाही' हें त्यांचे उत्तर !

चारचौघांत अघळपघळ गप्पा मारणारे इसम घरच्या माणसांचे काळ असतात. बरं ज्यासाठीं एवढी रागवारागव व धुसपुस चालतें तो प्रयत्न तरी साध्य होतो का ? मुळींच नाहीं. संस्थांचे चिटणीस यांना रावसाहेब, श्रीमंत, अण्णासाहेब अशीं विशेषणें देतात पण तीं केवळ तोंड देखलीं. त्यांनी वर्गणीच्या पैशाचें तोंड पाहिलें कीं, त्यांचें तोंड

मिटलें. मग वर्षभर हे कोणी नाहीत नि ते कोणी नाहीत. रस्त्यांत भेटल्यावर नमस्कारापुरती ओळख, पण ती सुद्धां अन्त:करणापासून नव्हे! असल्या लोकप्रियतेला भुलणारीं माणसें आपल्याला घरोघरीं दिसतात. लोकप्रियतेचें नाणें सदैव त्यांच्या जवळ असतें असें त्यांना वाटतें. पण तें नाणे नकली असतें हें त्यांच्या गांवीहि नसतें.

माझ्या ओळखीचे एक सुखवस्तू गृहस्थ आहेत. त्यांजकडे त्यांचा एक गरीब नातलग विद्यार्थी कॉलेजच्या फीसाठीं मदत मागावयास गेला. तेव्हां ते त्यांस म्हणाले. ' अरे, तुला मदत देऊन काय उपयोग? तुला मदत केल्यानें माझे नांव थोडेंच छापून येणार आहे? त्यापेक्षां एखाद्या संस्थेला देणगी दिली तर वर्तमानपत्रांत दहा ठिकाणीं माझें नांव झळकेल! माझ्या माहितीच्या एका सेवानिवृत्तानें एका संस्थेच्या इमारत फंडासाठीं १० रु. ची देणगी दुसऱ्या दिवशीं ताबडतोब वर्तमानपत्रांत नांव छापण्याच्या अटीवर दिली होती. दुसऱ्या दिवशीं पहाटे उठून चहा घेण्याच्या आंत पेठेंत नाक्यावर जाऊन यांनी वर्तमानपत्र विकत आणले व आपल्या नांवांपुढें मुद्दाम तांबडया पेन्सिलीनें खूण करून ठेवली व मग चहा घेतांना त्या नांवांकडे कुतुहलानें सारखें पहात होते ते. त्या दिवशीं गांवांत ताठ मान करून ते चालत होते. आणि कोणी ओळखींचें गृहस्थ वर्तमानपत्र वाचीत असल्यास मुद्दाम तेथें जाऊन आज काय नवल विशेष आहे पत्रांत?" असें विचारीत.

' आज महात्माजींचा दिल्लीस मोठा सत्कार झाला. २००० रु. ची थैली त्यांना अर्पण केली. ५० सार्वजनिक संस्थांनीं हार घातले. गांधीजींचे हृदयस्पर्शी भाषण झाले ' असें त्या गृहस्थानें उत्तर दिले.

' आणखी कांहीं नवल विशेष? '

' बाकी आज इतर मामुली बातम्याच आहेत '

' आमचं नांव आढळलं नाहीं कां तुम्हांला? '

‘ नाहीं. कुठे आहे ?’

‘ ते बघा. त्या जाहिरातीच्या खालीं. त्या कोपऱ्यांतल्या दोन ओळी.’

‘ हां हां तेच तेच वाचा. मोठ्यांनी वाचा.’

‘ वाचलं—तुम्ही १० रु. ची देणगी दिली आहेत. चांगली गोष्ट आहे.’

‘ अहो आज हजारो लोकांच्या डोळ्याखालून हा मजकूर जाणार आहांत कुठं ?’

‘ तर तर फार मोठी कामगिरी आपण केली आहे !’

* * *

एखाद्या लक्षाधीश व्यापाऱ्याला पुष्कळ संस्था सभांना बोलावतात, त्यांना अध्यक्ष करतात. शाळांचे मुख्याध्यापक त्यांच्या हस्ते बक्षिससमारंभ करतात, हारतुरे घालतात ते त्यांच्या गुणांची पूजा करण्यासाठीं म्हणून नव्हे, तर त्यांच्यापासून संस्थेला कांहीं लभ्यांश होईल म्हणून ! वर्तमान पत्रांत ‘ आपल्या अध्यक्षतेखालीं हा गोड समारंभ झाला ’ हे छापलेले वाचून व क्वचितप्रसंगी आपला फोटो पाहून यांना आपण अत्यंत लोकप्रिय विभूति आहो असें वाटते, या लोकप्रियतेच्या भ्रमांतच ते गुंग असतात, व यांच्याजवळ पैसा असेपर्यंत यांची ही लोकप्रियतेची गुंगी टिकते. आमच्या ओळखीच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याचें नांव ‘ त्याच्या अध्यक्षतेखालीं सभा भरणार आहे ’ म्हणून एका प्रतिष्ठित वर्तमानपत्रांत एका वर्षांत ४० वेळां आले पण आतां त्या व्यापाऱ्याचा पडता काळ आल्यापासून त्याचे एकदां तरी नांव छापून आले असेल तर शपथ ! ‘ जोवरी पैसा तोवरी बैसा ’ हा व्यवहारांतील न्याय यांच्या लोकप्रियतेलाहि लागू पडतो !

हीच स्थिती राजकीय बाबतींत. हल्लींच्या राजकारणांत भावनेला जास्त महत्त्व आहे. पुष्कळ तरुण स्वार्थाचा होम करून राजकारणाच्या खाईत उडी घेतात. पण लोकप्रियतेच्या गंगेत हात धुवून घेणारे तरुणहि कांहीं

थोडेथोडके नसतात. मॅट्रिक परीक्षेच्या वाऱ्या करून थकलेल्या व कॉलेज-मध्यें प्रीव्हियस, इंटरमध्यें सतत नापास होणाऱ्या विद्यार्थ्यांनीं असहकारितेंत शाळा कॉलेजे सोडली. कशासाठीं राष्ट्रासाठीं! नुस्त्या माशा मारणाऱ्या वकिलांनीं त्या काळांत वकिली सोडली व लोकप्रियतेच्या गंगेंत हात धुवून घेतले- हे लोक तुरुंगांत गेले ते अन्त:करणाच्या तळमळीमुळें नव्हे तर केवळ लोकप्रियतेसाठीं. तुरुंगांत गेल्यावर शरिराचे वजन कमी झाले तरी चार लोकांत वजन वाढते म्हणून ते गेले. शिक्षा झाल्यावर वर्तमानपत्रांत आपलें नांव छापून येईल, सुटून आल्यावर अमके दे. भ. सुटले, ज्ञानप्रकाश अर्धा आणा म्हणून रस्त्यावरील वर्तमानपत्रें विकणारीं पोरे आपल्या नांवांचा जयघोप करतील, स्थानिक पुढारी आपल्या स्वागतासाठीं स्टेशनवर येतील, आपली मिरवणूक निघेल, गळ्यांत हार पडतील आपल्या अभिनंदनपर सभा भरतील असें त्यांना वाटत असतें. कोणास ही अतिशयोक्ति वाटेल पण खोल विचारान्ती आमचेंच म्हणणे त्यांना पटेल. तुरुंगांतून सुटून आलेल्या माझ्या कांहीं मित्रांना मी भेटावयांस गेलों होतों एक म्हणाले, 'कायहो, मला शिक्षा झाली तेव्हां केसरींत माझे नांव छापले होते कां?'

मी म्हटले 'नाहीं.' 'आता तुम्हीच सांगा किती पार्शल आहे केसरी?' ते म्हणाले.

दुसरे म्हणाले 'आपल्या जिल्ह्याच्या समाचारांत माझा फोटो आला होता का?' मी म्हटलें 'नाही.' 'पाहिलेत द्वेष, निव्वळ द्वेष! कसा आपला देश पुढें येणार?' ते म्हणाले. मी म्हटले 'वेड्या, तुझा फोटो छापावयाचा कसा? अजून एकदा तरी तूं आपला फोटो काढून घेतला आहेस का?'

तिसरे म्हणाले 'कांहि करा, पण आमच्या अभिनंदनपर सभा भरवा. यांत तुमचें काय वाईट होत आहे? तुमचेंहि नांव होईल, आमचेंहि होईल.'

देशाभिमानाचें अंगांत वारें खेळण्याऐवजीं यांच्या अंगांत कसल्या प्रकारचें वारें खेळत होते तें पाहा! पण चळवळीची लाट ओसरल्यावर यांच्या लोकप्रियतेचीहि लाट ओसरते. अशा प्रकारच्या लोकप्रिय मूर्ती लवकरच भंग पावतात.

अशाच एका मालवलेल्या माझ्या देशभक्त मित्राची हकीकत ऐकण्यासारखी आहे. हे मित्र फार आजारी होते हें मला वर्तमान पत्रांतून कळलें. त्यांचें चाळीस पौन्ड वजन कमी झालें. सायंकाळीं १०५° ताप असतो. सकाळीं उतरत नाहीं. आज झोप छान लागली. आज हुषारी आहे. आज सहा मुसंब्याचा रस, १ शेर ताजे ताक, अर्धा शेर दूध, अर्धा शेर दुधाची साबुदाण्याची खीर व दोन डाळिंबें अगदीं बळेंबळें खाल्लीं. गेल्या वीस दिवसांत आजच सकाळीं दोन शब्द बोलले. आज ताप पूर्णपणें उतरला. वजन थोडथोडें वाढूं लागलें. रोज घरीं वजन करतात, इत्यादि बातम्या माझ्या रोज कानावर येत. हे गृहस्थ व मी अगदी लंगोटी मित्र होतों. पण पुढें शाळा सोडून हे देशभक्त झाले! तेव्हां त्यांचें नांव रोज छापून यावयाचें. त्यामुळें त्यांना भेटायची माझी मलाच लाज वाटूं लागली. गेल्या पांच सहा वर्षांत मी त्यांजकडे फार तर दोन तीन वेळां गेलों असेन. हो ज्यानें त्यानें आपल्या पायरीनें वागावें. पण वर्तमानपत्रांत जेव्हां चाळीस पौन्ड वजन कमी झालेलें वाचलें तेव्हां मनांत चरर् झालें व माझ्या मित्राला मी भेटावयास गेलों. मित्राच्या चेहऱ्यावरून तरी त्याचे ४० पौन्ड वजन कमी झालेलें दिसत नव्हते व चेहराहि फारसा उतरलेला नव्हता. साधारण पडशा खोकल्याचा ताप आल्यावर किंवा पाठींत उसण भरल्यावर एक दोन दिवस जसा चेहरा दिसतो तसा दिसत होता. 'आतां रोज २।३ पौन्ड वजन वाढूं लागलें आहे. रोज येथें वजन करतों. झपाट्यानें सुधारणा होत आहे. आठ पंधरा दिवसांत प्रकृति पूर्ववत होईल' असें तो मला म्हणाला. मी म्हटलें 'आहेच तुझ्याकडे अनायसें वजनाचा कांटा.

मी वजन करून पहातों. बरेच दिवसांत वजन केलें नाही' आतां आलं अंगलट. बिंग बाहेर पडणार. तो मला म्हणाला 'अरे कसला काटा घेऊन बसला आहेस! निव्वळ थापा आहेत या! बरेच दिवसांत नांव छापून आलें नाही म्हणून मी हा मार्ग पत्करला!'

आतां जे खरेखुरे लोकप्रिय असतात त्यांना लोकप्रियतेची देणगी ही ईश्वरी देणगी म्हणून मिळालेली असते. पृथ्वीच्या पाठीवर असले लोक फार थोडे असतात. त्यांच्या लोकप्रियतेला त्यांच्या अंगी असलेले लोकोत्तर गूणच कारणीभूत होतात. असले लोक आपल्या लोकप्रियतेचा उपयोग राष्ट्रकार्याकरतां करतात. राष्ट्राकरितां चन्दनाप्रमाणें ते आपलें आयुष्य झिजवितात. राष्ट्राच्या समुद्रकिनाऱ्यावर लोककल्याणाचें पाऊल ठेविलें कीं स्वार्थाच्या वाळूचे कण यांच्या पायाखालून आपोआप घसरत असतात. देशाचे दास म्हणविण्यांत ते भूषण मानतात. असले थोर पुरुष कोणत्याहि गांवाला जाण्यापूर्वी त्यांची कीर्ति त्या गांवाला अगोदर जाऊन पोचते. आणि तीच त्यांचें स्वागत करावयास लावते. त्यांच्या काळजाचे दोन कप्पे म्हणजे स्वराष्ट्र आणि त्याच्या आकांक्षा हे होत. माणसाची सावली जशी त्याला सोडीत नाही तशी जनताहि त्यांना सोडीत नाहीं. कथेकऱ्याच्या कानांतील डूल डुलूं लागले कीं श्रोतेहि डुलूं लागतात. गुणी माणसाचे गुण डुलूं लागले कीं जनताहि डुलूं लागते. कथेकऱ्याच्या मागे तंबोरी विनयाने उभी असते. लोकप्रिय माणसाच्या मागे जनतेची सहानुभूति उभी असते. तंबोरीची तार छेडली कीं सुरेल सूर निघूं लागतात. जनतेच्या मानसिक तंतू वाद्यावर लोक कार्याची नखी फिरविली कीं तीहि सुरेल सूर काढूं लागते. तंबोरी कुरकुर करूं लागली कीं तिचा कान पिळतां येतो. जनता आड मार्गाला जाऊं लागली तर तिचाहि कान पिळतां येतो. लोकप्रिय माणसाच्या अंगींहि दोष असतात. पण त्याचीं नखे जनतेला बोचत नाहींत. सिंहिणीचीं नखे आपल्या पिलांना बोचत नाहींत. काटेरी

झाडाला स्पर्श केला तर काटे बोचतात. पण त्याच्या सावलीचे काटे बोचत नाहींत. त्याची महत्त्वाकांक्षा अमर असते. त्याचें कार्य कधीहि संपत नाहीं. टेकडीच्या पुढें गेलों कीं पर्वत दिसतो. पर्वतापुढें महापर्वत दिसतो. त्याप्रमाणें त्याच्या कार्याचें. त्याचा आत्मा नेहमीं असंतुष्ट असतो. देशाकरतां आपल्या हातून फारच अल्प सेवा घडली असें याला नेहमीं वाटत असतें. मृत्यूपूर्वी वातांत जरी हा बडबडला तरी त्यांतहि या परतंत्र राष्ट्राचाच त्याला ध्यास लागलेला असतो. यानें भूलोकावर देह ठेविला कीं याच्या खांद्याला खांदा देणारे लोक याला खांदा देतात. मग तेथे जात नाही, गोत नाही, धर्म नाही, कांहीं नाहीं. याच्या मृत्यूनंतर लोक याची मोठमोठीं स्मारकें उभारतात व अमक्या अमक्या थोर विभूतीचें हें स्मारक असें म्हणून त्यावर लिहिलेलीं अक्षरें मोठया कृतज्ञतेनें वाचतात.

असो. हा विषयच असा अवीट आहे कीं त्यावर जितकें बोलावें तितकें थोडेच आहे. पण दुर्दैवानें परीक्षकांनी मला पुष्कळ वेळपर्यंत बोलण्याची देणगी दिली नाहीं. यावेळीं नव्यानें सासरी गेलेल्या खेडेगांवांतील जांवयाची मला आठवण होते. फराळाचीं पानें वाढल्याशिवाय तक्क्याशी टेकलेल्या जांवयाला कोणी हांक मारीत नाही. जांवई पानावर बसतात तों संध्येचें साहित्य जवळ! संध्या न करावी तरी पंचाईत. जांवयांना संध्या येत नाहीं म्हणून चेष्टा व्हावयाची! बरं करावी तर पानें वाढलेलीं; लोकांना आपल्याकरतां उगाच तिष्ठत बसावें लागणार. शेवटीं जांवई चार आचमनें टाकतात. सर्व लोक त्यांच्याकडे कुतूहलानें पाहातात. माहेरचें ऐश्वर्य पाहून ‘इकडे’ काय वाटतें हें पाहाण्यासाठीं त्यांची अर्धांगी उंबरठया आड लपून सस्मित मुद्रेनें त्यांच्याकडे पाहात असते. जरीचा परकर नेसलेली धाकटी मेहुणी ताजे भाजलेले पापड वाढायची खोळंबून असते. त्यांतील सर्वांत मोठा पापड त्यांना वाढण्यासाठीं तिनें हातांत ठेऊन सुद्धां दिलेला असतो. इतक्यांत त्यांना ऐकूं जाईलसे ‘ सांजा निवेल बाई, उगीच वाढला लवकर’ असें

सासूबाई हळूच म्हणत असतात. मग सासूबाईची आज्ञा मोडायची कशी म्हणून संध्या लवकर आटोपून ते फराळाला बसतात.

जावई बोवाप्रमाणेंच मीहि नव्यानें व्याख्यान द्यावयास येथें आलों आहे. आज जरी मी कुणाचा जांवई नसलों तरी लवकरच होणार आहें. ' वेळेची ' सासू मला सांगत आहे 'पुरे आतां' ! फराळाचे पदार्थ येथें याव-याचे नसले तरी तुम्हाला बौद्धिक मेजवानी देणारी मंडळी येथें खोळंबून आहेत. तेव्हां मी आतां आटोपतेंच घेतो. संध्या अर्धवट आटपून जांवई-बोवा त्याच पानावर बसले. मी या संध्यासमयीं आपल्या जागेवर जाऊन बसेन. ते उन्हून शिरा खातील. मी हवा खाईन आणि फारच झालें तर शेजारच्या विश्रान्तिगृहांत जाऊन चहा पिईन !

---

( ता. १८ जानेवारी सन १९३० रोजीं सर परशुरामभाऊ कॉलेज-मध्यें वक्तृत्वाच्या वार्षिक चढाओढीच्या समयीं आयत्या वेळीं ( Extempore Speech ) जें भाषण केलें त्याचा सारांश खालीं दिला आहे. या भाषणास त्यावेळीं पहिलें बक्षिस मिळालें होतें. )

# विनोदी जोडपें.

( अरूण व उषा या दोघां पदवीधरांचा नुकताच विवाह झाला होता. कॉलेजमध्यें शिकत असतांना दोघांचीहि ओळख होती. त्यांच्या मोहक चेहऱ्यावर स्मित हास्यानें तेव्हांपासूनच ठाणें दिले होतें. त्यांच्या दाट ओळखीचें लग्नांत रूपांतर झाल्यामुळें जणूं काय दुधसाखरेंत केशर पडलें होतें. विरहाची गोड हुरहूर चहांतील बिस्किटाप्रमाणें विरघळली होती. अरूण राजबिण्डा दिसे. उलट उषा काळीसावळीच पण मोठी चुणचुणीत दिसे. दोघेहि विनोदप्रिय, तेव्हां त्यांच्या संभाषणांत हास्याची सर न आली तरच नवल! )

अरूण:—गेल्या तीन तासांत तिचं दर्शन झालं नाहीं. मनाला कशी हुरहूर लागली आहे. ( खिडकींतून रस्त्याकडे पाहून ) ओहो ! उषा म्हण तांच उषा हजर आहे. किती तिचा आनंदी व खेळकर स्वभाव! रस्त्यांतून येतांना सुद्धा ती पदराशीं खेळत आहे. ती पदराशीं खेळूं लागली म्हणजे माझ्या नयनांतील कृष्णबाहुल्याहि प्रीतीच्या शुभ्र पदराशीं खेळूं लागतात. यावं. यावं. तुला मरेपर्यंत आयुष्य आहे. ( बोलत नाहीं असें पाहून ) कां आज तोंडाचे दार बंदसें आहे ? नाहीं बोलायचं ?

उषाः—( मानेनें नकार देते )

अरूण:—अग दारावर टिचकी मारली तर दार उघडतें. मग गालावर टिचकी मारून तोंड कां नाहीं उघडणार ?

उषाः—( हसून पण लटक्या रागानें) सदानकदा जोतिषाची रड आहे. जेव्हां पहावं तेव्हां यांच्या तोंडीं आपले ग्रह आणि तारे. थोडी कां बुद्धिमत्ता आहे ? पण या एका वेडानं......

अरूण:—वेड ! वेड ! हः हः हः अग कोणच्या तरी शास्त्राचं लहानपणापासून वेड लागलं म्हणजे मरतांना तो मनुष्य जगाला वेड लावून जातो.

( तिच्याकडे निरखून पाहून ) कांहीं म्हण, आज तू गोड दिसतेस. आज मोठी तूं गोड दिसतेस अगदीं !

उषाः—अस्स. आला वाटतं प्रेमाचा उमाळा.

अरूणः—अग तुझा टोपपंदरं पाहिला कीं मला टोपी सावराविशी वाटते, आणि माझी टोपी पाहिली कीं तूं टोपपदर सावरतेस. चालतांना तुला पाठमोरी पाहिली कीं विद्युल्लतेचा भास होतो. आणि सामोरी पाहिली कीं दिशाभूल होते.

उषाः—हो आहेच मी सुंदर ! नाहीं का मी सुंदर ? आहेच की मी सुंदर ! !

अरूणः—तर तर, जरा कुठं सुंदर वर्णन केलं तर काय चढलीस ! मला टेपच लावला पाहिजे. ( मेझरटेप आणतो व उंच करून तिची उंची पहातो. )

A beauty of Paris indeed! Verily you are a सुवासिक उदबत्ती !

उषाः—अस्सं कां ! आकाशांतील मेघ काळेकुट्ट असले तरी त्यांच्या पोटी स्फटिकाप्रमाणें शुद्ध आणि अमृतासारखें गोड पाणी नसतें कां ?

अरूणः—पण तेच मेघ आम्रतरूंचा मोहोर नाहीं कां खुडीत ?

उषाः—एवढं नको कांहीं हिणवायला. ज्याच्या योगानं तुमच्या मुखमंडलाला शोभा येते ते कुरळ कुंतल काळे नाहींत कां ? तुमच्या डोक्यावरची टोपी काळी नाहीं कां ? जिच्या योगानं सर्व सृष्टिसुख तुम्हाला पिता येतं व जिच्या गतिवरून प्रेमाची गति ओळखतां येते,ती नयनांतील बाहुली काळी नाहीं कां ?

अरूणः—छान छान.

उषाः—वसंतऋतंत आम्रतरूंवर कूजन करणारी कोकिळा काळी नाहीं कां ?

अरूणः—वा वा !

उषाः—जिच्या योगानं सर्व कानन दरवळून जातं ती हरिणीच्या नाभींतील कस्तुरी काळीं नाहीं? एकवेळ आपल्या मुलाला मांडीवर घ्यायचं सोडील, पण ज्याला मांडीवर घेतल्याशिवाय गोळाभर अन्न खायला मिळायचं नाहीं, त्या मृदंगवाल्याच्या मृदंगावरची शाई काळीं नाहीं ?

अरूण:—शाबास तबलजी.

उषाः—गुंजेचें सर्वांग लाल असतें पण तिचं मुख काळं नाहीं ? सौन्दर्यसुखाचं सरोवर करणारा गालावरचा तीळ काळा नाहीं ?

अरुणः—( भिवयां चढवीत खाकरतो. )

उषाः—तुमचा देह मदनासारखा सुंदर असला तरी तुमची सावली काळी नाहीं ? फार काय जिच्या योगानं तुमच्या आमच्या जन्माच्या गांठी पडतात ती गळ्यांतील पोत काळी नाहीं का ?

अरुणः—बरं बोलतेंस कीं ग.

उषाः—इकडच्या सहवासानं काय सुसाध्य होणार नाहीं ?

अरुणः—अग अगदीं बॅरिस्टरच्या बायकोला शोभण्यासारखं तुझं ब्रीफ असलं तरी किती फोल आहे बघ. काळी छत्री दाखवून जनावरं बाजूला पळतात नाहीं की नाहीं ?

उषाः—पळतात.

अरुणः—काळी छत्री पाहून जर जनावरं बाजूला पळतात तर काळ्या बायका पाहून माणसं बाजूला पळतील यांत काय नवल ? ... ... चेहरा पडायला नको कांहीं. अः अग त्यांत काय आहे ? शकुन्तला, मेनका, रंभा वगैरे सर्व सुंदरीची वर्णनं कवींनीं काळ्या शाईतच नाहीं कां लिहिली?

उषाः—एवढं दुसऱ्याला हिणवून हिणवून बोलायचं. इकडचं रूप तरी काय मोठं ऊतू जातय अगदीं.

अरुणः—हात्तिच्या ! मी काळा आहे म्हणतेस ना ? अंः त्यात काय आहे ? अग पुरुषांनीं काळं असणं बुद्धिमत्तेचं लक्षण आहे.

( मोठयानें हंसतो. खो खो हंसतो, तीन मजली हसतो. )

उषाः—केवढांदी हसायचं तरी.

अरुणः—अन्तःकरणांतील प्रेमक्षीराला हास्याच्या उकळ्या आल्या कीं समाधानाची साय येते.

उषाः—मी म्हटलं त्या साईचं विरजण घालीन हो.

अरुणः—माझ्या भावी आयुष्यामध्यें मी गरिबांच्या दुःखावर विरजण घालणार आहे.

उषाः—स्वारी आज खुषींत दिसते मोठी !

अरुणः—स्वारी ! स्वारी शब्दाचा मला भारी तिटकारा आहे. काय म्हणे संस्थानिकांची स्वारी. बाईसाहेब पाहिल्या कीं लगेच खाशी स्वारी. अग, बुधवारांतील टांगेवालासुद्धां म्हणत असतो, रावसाहेब, तीन आणे स्वारी !

उषाः—स्वारी शब्दावर स्वारी करावयाचा बेत दिसतोय अगदीं.

अरुणः—( खिन्नान्तःकरणानें ) अग परतंत्र देशांतील लोकांना आतां शब्दावरच स्वारी करण्याची पाळी आली आहे ! तोरणा किल्ला गेला नि घरदारांवर आतां काचेचीं तोरणें दिसूं लागलीं. ( जांभई देत ) किती वाजले ग ?

उषाः—सहाला चार मिनिटं नि १० सेकंद कमी.

अरुणः—थोडा चहा ठेव ग.

उषाः—नाहीं ठेवीत जा चहा. किती वेळां चहा प्यायचा तरी. मला वाटतं महात्माजीप्रमाणें प्रायोपवेशनाऐवजीं चहाप्राशनच सुरू करा. आद्य चहापान प्रवर्तक म्हणून नांव तरी होईल तुमचं.

अरुणः—काय नाहीं ठेवित ना चहा ?

उषाः—नाहीं नाहीं नाहीं.

अरुणः—पाहिलंत पाहिलंत बायका विदुषी असल्या म्हणजे नवरे असे विदुषक होतात ! आज मला सभेला जायचं आहे.

उषाः—जायचं असेल, हजार प्रेक्षक त्यांत एक तुम्ही.

अरुणः—तसं नव्हे ग. आज मी अध्यक्ष आहे. आज मला हार घालणार आहेत. ( नाकानें सुवास घेतल्यासारखें करून ) आज मला हार घालणार आहेत.

उषाः—( लडिवाळपणें ) खरंच कां हें ? अगदीं खरं ? तर मग ठेवतें हो चहा. युरोपियन लोकांप्रमाणें पतीबरोबर पत्नीनं सभेला जायची चाल असती तर किती छान झालं असतं.

अरुणः—एवढंच ना. आपण नवीन पायंडा पाडूं. चल माझ्याबरोबर चल लवकर. मी परवां आणलेलं कोइमतुरी पातळच तूं नेस. त्यांत मोठी खुलून दिसतेस तूं. " मीटींगचा वखुत होईल, मैतरणी बिगी बिगी चाल. "

अरुणः—( सभेला जातांना ) आमचा दोघांचा जोडा काय छान दिसतो आहे? कारण आम्ही दोघांनीं पायांत पुणेरी जोडा घातला आहे. हिच्या चालण्यांत तर मोठी Grace आहे. फार काय, प्रेक्षकहो ! आम्हां दोघांकडे तुमच्या बघण्यांत सुद्धां मोठी Grace आहे बोवा.

---

[ ता. १९ जानेवारी सन १९३० रोजीं सर परशुरामभाऊ कॉलेजमध्यें वक्तृत्वाच्या वार्षिक चढाओढीच्या वेळीं हा प्रवेश साभिनय करून दाखविला. त्यावेळीं मला पहिलें बक्षिस मिळालें होतें. ]

# ती. आबांचे ‘सत्याचे प्रयोग’

आमचे आबा कोंकणचे रहिवासी. घरची शेतवाडी चांगली. गांवांतील चार सुखी कुटुंबांत ते मोडत. पण सुखाला गालबोट लागलेलें नाहीं असा जगांत कोण आहे ? गेलीं पांचसहा वर्षें आबांना पोटदुखीनें हैराण केलें होतें. पण गांवांतील गांवगुंड त्यांच्या पोटदुखीचीं कारणें अगदीं निराळीं सांगत. कोणी म्हणे “सासऱ्याची इस्टेट यांच्या घरांत आली तेव्हांपासून यांचें पोट दुखूं लागलें.” कोणी म्हणे, “गांवांत कोणाला दोन पैसे साटे-लोटयांत मिळाले, कोणी जमीनजुमला वाढविला, कीं आबांचें लहानपणा-पासून पोट दुखूं लागावयाचें. तीच त्यांची खोड कायमची झाली !” भिक्षुक म्हणत कीं, “सासऱ्याची चांगली इस्टेट उपटली, पण त्याच्या नांवानें वर्षांतून दोन ब्राह्मणसुद्धां हे सांगत नाहींत; मग कां नाहीं पोट दुखणार ?”

पण या पोटदुखींत भर म्हणूनच कीं काय अलीकडे आबांचे पोट फुगावयास लागलें होतें.

अंपाय झाल्यावर उपाय केलाच पाहिजे. स्वस्थ बसून कसें चालेल ? आठपंधरा दिवस गांवठी उपाय केले. पंचक्रोशींतल्या चांगल्या वैद्याचा काढा घेऊन पाहिला. पण रोग कांहीं मागें पाऊल घेईना. उलट रोगाचा तेथें घर करून रहायचा बेत दिसूं लागला. कारण त्यानें आपली बायको सौ. अशक्तताबाई व चि. चिडखोर यांना पत्र पाठवून तावडतोब बोला-विलेंहि होतें.

गांवकऱ्यांनीं “ हयगय करूं नका. मागाहून दुखणं विकोपाला जाईल, तुम्हीं पुण्यामुंबईचा रस्ता धरा.” म्हणून परोपरीनें विनविलें. आबांच्या कुटुंबानेंहि त्यांच्या मागें सारखा लकडा लावला. तेव्हां कोठें आबा व्यव-हाराची तात्पुरती आवरानिवर करून पुण्यास जावयास निघाले.

आबांचा भाचा पुण्यास नूतन मराठी विद्यालयांत मास्तर होता. तेव्हां पुण्यास कोठें उतरावयाचें हा प्रश्नच नव्हता. चांगली सोन्यासारखी सोय होती. महिनाभर रहायचें म्हटलें तरी कोणी नको म्हणत नव्हतें. पथ्यपाणी करायला भाचाची बायको चांगली खबरदार होती. त्यामुळें आबांनीं तूर्त एकटेच जायचें व एखादें सत्तक औषध घेऊन गुण येऊं लागल्यावर तेंच औषध घेऊन घरीं यायचें असें ठरविलें.

आबा म्हणजे नंबर एकचे कंजुष ! दिडकी खर्चायची म्हणजे त्यांना प्राणसंकट वाटे. महाशिवरात्रीला अगर श्रावणी सोमवारीं देवळांत गेल्यावर सुद्धां पैसा ठेवूं का नको म्हणून कडोसरी जवळ ते दहा वेळां हात नेत व दहा वेळां मागें घेत व तसेंच प्रदक्षिणा घालीत. आणि मग प्रदक्षिणा झाल्यावर लोक देवापुढें पटापट पैसे ठेवतांना पाहून, मनांत खजील होऊन शिवराई देवापुढें ठेवीत ! मग तुम्हींच सांगा ते आबा का स्टेशनवरच्या हमालाला दोन आणे देणार ? ” अरे दोन आणे देऊन आमच्या गांवाला तब्बल एक वेळ गडी कामाला मिळतो, नि तुला पांच मिनिटांकरिता का दोन आणे देऊं ? एक ढबू देईन, यायचं असेल तर ये ” म्हणून आबा खसकन् त्याच्या अंगावर ओरडले.

पण आबांचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच तो तेथून निसटला होता. पोट दुखत असलें तरी घरीं गेल्यावर सोडा खाऊं, आतां एका हातांत बोचकें व छत्री, दुसऱ्या हातांत देशपांड्यांकडे पोंचवायचें पाहुणें बोचकें व डोक्यावर वळकटी ठेवावी असें त्यांनीं मनाशीं ठरविलें. डोक्यावर फेटयाची आयती चुंबळ होतीच म्हणून त्यांनीं वळकटी डोक्यावर ठेविली पण आबा मटकन् खालीं लवले. कारण त्यांची वळकटी म्हणजे शहरी ‘ बेडिंग ’ नव्हतें. त्यांच्या वळकटीला मेतकुताचा, भाजणीचा, पोह्यांचा, पापड्यांचा तर खमंग वास येतच होता; पण शिवाय पंधरा अधोल्या तांदूळ तिच्यांत लपून बसले होते. आबा कसे तरी कुथतमाथत स्टेशनबाहेर

आले. शेवटीं टांगेवाल्याशीं भाडयाची बराच वेळ हेंगल घालून आबा एकदांचे भाच्याच्या बिऱ्हाडीं येऊन थडकले. त्यांचा भाचा रामभाऊ हा शाळेंत गेला असल्यामुळें संध्याकाळशिवाय त्याची भेट झाली नाहीं. रात्रीं जेवणखाण झाल्यावर उद्यां कोणाचें औषध सुरू करायचें याविषयीं त्या दोघांत बराच खल झाला. आबांचा आर्य वैद्यकांवर फार विश्वास. याचें कारण खेडयांत डॉक्टर नसल्यामुळें उभ्या पन्नास वर्षांत त्यांनीं डॉक्टरच्या औषधाचा घोटसुद्धां घेतला नव्हता. देशी औषधांनीं उपाय झाला नाहीं तरी अपाय खात्रीनें व्हायचा नाहीं अशी त्यांची खात्री होती. कारण कंपाउंडरच्या हलगर्जीपणामुळें भलतेंच औपध मिळून संस्थानिकांसारखीं मोठमोठीं माणसें दगावल्याचें त्यांनीं वर्तमानपत्रांतून वाचलें होतें. तेव्हांपासून त्यांना डॉक्टरची दहशत बसली होती. आबांच्या बोलण्याचा रोख पाहून भाच्याला हसूं आलें. तो म्हणाला, 'मामा रेल्वे मोटारींचे दरवर्षीं थोडे का अपघात होतात ? मग त्यांत बरें तुम्ही बसतां ? उलट डॉक्टरच्या चुकीनें जेवढे रोगी मेले असतील त्यांच्या सहस्रपट वरील अपघातांनीं मेले असतील. हें ऐकून आबांची समजूत पटली व वैद्यांच्या औषधानें गुण नच आला तर मग डॉक्टरचें औषध घ्यावयाचें असें त्यांनीं ठरविलें.

सकाळीं चहापाणी झाल्यावर 'कोणच्या वैद्याकडे जायचें' म्हणून भाच्यानें विचारलें. 'अरे बाबा पुणें हें बुद्धिमत्तेचें आगर आहे, येथील साधा वैद्य घेतला तरी खेडयांतील दहा वीस वैद्यांना सहज खाकोटीं मारील, तेव्हां कोणाकडेहि चल,' आबा म्हणाले. रस्त्यांतून जातांना आम्हांला डोंगरे वैद्याची प्रथम पाटी दिसली, नि तेथेंच आम्ही शिरलों.

आंत गेलों तों वैद्यराज कादंबरी वाचीत बसले होते. त्या तीन खणी दवाखान्यांत उदबत्तीचा गोड सुवास येत होता. एका लहानशा देवदारी कपाटांत औषधांची सामुग्री ठेवलेली होती. आमची चाहूल लागल्यावर वैद्यराज एकदम दचकले.

" या बसा. काय काम आहे ? "

" यांची प्रकृती दाखवायची आहे. "

" या, असें पुढें या. ( नाडी, पोट सर्व पाहिल्यावर ) बरं जरा जीभ काढा पाहूं. "

" अहो पान खाणाऱ्या माणसाची जीभ पाहून काय कळणार ? " भाचा म्हणाला.

" काय कळणार ? अहो हजारों रोगी आमच्या डोळ्यांखालून गेलें आहेत. "

" नाटक–सिनेमांतील जाहिरातींप्रमाणें ना ! आपल्या जागेला पांच रुपये भाडें असेल नाहीं ? " भाच्यानें खवचट प्रश्न केला.

" समजलों, समजलों तुमच्या बोलण्याचा रोख. अहो हा रस्ता सारखा माणसांनी वहात आहे; तेव्हां त्यांतून हजारों रोगी माझ्या नजरे-खालून नाहीं का सहज जाणार ? " वैद्यबोवा हंसत म्हणाले.

" वैद्यबोवा तुम्ही त्याचें मनावर घेऊं नका. तो आहे शहरांतला. तेव्हां पंची झाला आहे बोलण्यांत. मी मुद्दाम कोंकणांतून आपल्याकडे आपली कीर्ति ऐकून आलों आहे. तेव्हां नीट शांत विचार करून औषधयोजना करा. " आबा म्हणाले.

वैद्य:—त्याची नका तुम्ही काळजी करूं. पण काळजी करण्यासारखा बारीक तुमचा रोग आहे. कदाचित् उदर––

आबा:—काय उदर ?––

वैद्य:–हो.भिऊं नका.अजूनझालं नाहीं पण होण्याचा संभव आहे. तुम्ही अगदीं वेळेवर आलांत. तुम्हाला एक मुळी देतों. ती रोज सकाळीं शिळ्या पाण्यांत उगाळून घ्यायची व दूध प्यायचें. जेवायचें नाहीं, दुधावर रहायचें एका सप्तकांत तुम्हाला पूर्ण गुण येईल.

वैद्यबोवांना एक रुपया तूर्त देऊन ते घरीं आले. औषध सुरूकेल्यामुळें आबांना जेवायचें नव्हतेंच. शहरांतलं दूध म्हणजे नुसतं फुळकवणी, त्यांनीं काय होणार कात ? शिवाय लहानपणासून आबा मुलखाचे खादाड ! भुइमुगाचे दाणे म्हणा, गुळ–खोबरें म्हणा, रताळीं म्हणा–दिवसांतून दहा वेळां त्यांना तोंड हालवायची संवय ! रिकाम्या पोटीं त्यांना कोठला धीर निघायला ? इतक्यांत खमंग असा बेसन भाजल्याचा शेजारच्या हॉटेलांत वास सुटला. त्यांच्या तोंडाला पाणी सुटलें. लगेच रुमाल बांधून हॉटेलांत जाऊन तीन चार लाडू खाऊन ते घरीं आले.

दुधाच्या भांड्याला ताकाच्या बोटाचेंसुद्धां विरजण पुरतें. रोगी प्रकृतीचेंहि तसेंच. इवल्याशा कुपथ्यानेंसुद्धां बरा झालेला रोग मूळ पदावर येतो. मग त्या रात्रीं आबांची काय अवस्था झाली असेल याची कल्पना करा. दिवस मावळल्यापासून त्यांच्या पोटांत सारख्या तिडका मारूं लागल्या. रात्रीं आबा आंथरुणावर गडबडा लोळूं लागले. सोडा खाल्ला, कढत पाण्याच्या पिशवीनें पोट शेकलें, पण कांहीं इलाज चालेना. रात्रभर अलोचन जाग्रण झालें. ' शेवटीं वाटेल तसें खाऊन चालावयाचें नाहीं, हेंहि खरें. आणि कडक पथ्य सोसायचें नाहीं, हेंहि खरें. तेव्हां दुसरा वैद्य पहाणें चांगलें ' असें आबांनीं पहाटे ठरविलें.

सकाळीं नऊ वाजतां आबांचा भाचा आणि ते नवीन वैद्याकडे गेले.

यांचें नांव वैद्यरत्न माणके होतें. यांचा सर्वच थाट निराळा ! यांच्या घरी बसायला खुर्च्या बाकें होतीं. शिवाय खुद्द वैद्यबोवांची बैठक पेशवाई नसून इंग्रजी होती. तेथील एकंदर वातावरणावरून यांची चांगली चलती असावी असें दिसलें. पहिल्यांदा वाटलें हा डॉक्टरचाच दवाखानाअसावा; कारण वैद्यबोवांनीं डॉक्टरसारख्या नळ्या गळ्यांत अडकवल्या होत्या. पुन्हां वाटलें घेरा ठेऊन हजामत केलेला व गंध लावलेला डॉक्टर सांपडणें निरळा. डॉक्टर म्हणजे नेहमीं बूट पाटलोणींत असावयाचा. पण जेव्हां एक दोन रोग्यांना औषधाच्या पुड्या देतांना पाहिलें, व मध–खडीसाखर

आणि आल्याचा रस हे शब्द कानीं आले तेव्हां खात्री पटली. शेजारीं बसलेल्या सुशिक्षित रोग्याजवळ आबांनीं नळीबद्दल चौकशी केली, तेव्हां तो म्हणाला, “ अलीकडे स्टेथास्कोप लावून रोगी तपासला म्हणजे त्याला बरें वाटतें; शिवाय यामुळें डॉक्टर व वैद्य यांत कांहींच अंतर नाहीं व सर्वांत मुख्य म्हणजे डॉक्टरच्या धंद्याला आळा बसावा म्हणून अलीकडे पुष्कळ वैद्य नळया वापरूं लागले आहेत. आतां त्यापासून त्यांना किती समजत असेल आणि रोग्यांना काय फायदा होत असेल हें एक परमेश्वरच जाणें ! ”

इतर रोगी तपासून झाल्यावर वैद्यबोवा आबांकडे वळले. त्यांनीं हात पुढें केला.

“ नाडी पहातोंच, पण नाडीपेक्षां या नळीनें सर्व कांहीं समजतें. अहो, जीं इंग्रजांचीं नवी साधनें आहेत त्यांचा उपयोग करून घेतलाच पाहिजे. ’ वैद्यबोवा म्हणाले.

“ अलबत ” भाचा म्हणाला.

“ वैद्यबोवा, माझ्या पोटांत काय ती गोम आहे. ”

“ पाहतों सर्व कांहीं पाहतों. ” तुम्हीं स्वस्थ पडा.

वैद्यबोवा—( छाती तपासल्यावर ) छातींत कांहीं नाहीं. लंग्ज साफ आहेत.

“ पाठ पहा ” भाचा म्हणाला.

वैद्य—हें पहा, तुम्हीं मध्यें बोलूं नका. काय पहायचें हें मला कळतें, तुम्हीं सांगायला नकोत. पाठ पाहून काय करायचेंय ? पाठींत कांहीं लंग्ज नाहींत ! ( पोटाला नळी लावून ) हं बिघडलंच आहे तुमचं पोट. नळ फुगले आहेत बहुतकरून, पाण्याचा आवाज येत आहे.

( यावेळीं भाचा तोंडाला रुमाल लावून हसूं लागला. पण त्यांत तें न मावल्यामुळें मोठया वेगानें बाहेर पडलें. )

वैद्य:---काय, हसायला काय झालें ?

भाचा---अहो, तुम्हीं आपलं हसें करून घेतां मग नको का हसायला? अहो पोटाला का कोणी नळी लावतात?

वैद्य---हो, हो, लावतात !

भाचा—अहो, 'एखाद्या डॉक्टरला जाऊन विचारा' !

वैद्य---डॉक्टरला काय. कळतं आहे कपाळ ! अहो, या डॉक्टरांनीं नुसतां चुथडा करून टाकला आहे. यांच्या बिलांनीं रोगी भिकारी होतात भिकारी. व्हिजिट फी, कनसल्टिंग फी, इंजेक्शन फी, घरीं इंजेक्शन दिलें म्हणून आणखी जादा फी, दंडावरच्या इंजक्शनाची फी निराळी, शिरेवरच्याची फी वेगळी,काय सांगू तुम्हाला,हजार लफडीं उभी करून रोग्याला पिळून काढतात.बरं एवढें करून तरी कांहीं गुण येतो कां? औषध बंद झाल्यावर हें टॉनिक ध्या नि तें कॉडलिव्हर घ्या......

भाचा---सगळं खरं पण पोटावर नळी लावून काय करणार कपाळ !

वैद्य---अहो, हा मीं नवीनच शोध लावला आहे. त्याचें असं झालं (वैद्यबोवा याच्याजवळ जाऊन बोलूं लागले. तों तों भाचा पोट धरधरून हसूं लागला.) का हो, यांना वेडबीड तर नाहीं ना लागलें?

भाचा---तुम्हाला बरीक लागलं आहे. वैद्यराज! जरा आपल्या गळ्यांतील अलंकाराकडे नीट निरखून पहा. अहो तुमच्या नळीला तीन ठिकाणीं तीन भोकें पडलीं आहेत ! लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकायची ती फेका. पण निदान नळी तरी बदलाल कीं नाहीं ?

वैद्यबोवा खजील झालें,पण लगेच आपल्या अज्ञानावर पडदा पाडण्यासाठीं रागाचा अविर्भाव आणून ते म्हणाले. "तुम्ही येथून जा पाहूं. असल्या नास्तिकांना औषध देण्याची माझी इच्छा नाहीं."

"आणि असल्या मूर्ख व विदुषकी वैद्याचें औषध घेण्याची आमची इच्छा नाहीं." भाच्यानेंहि खणखणीत उत्तर दिलें.

या सर्व भानगडींतून निष्पन्न काय झालें ? तर घरीं आल्यावर भाचा खांदे उडवीत व मिस्किलपणें हसत ही गंमत मित्रमंडळींना सांगत सुटे. ! अगोदरच त्याला हसायला नको. मंडळी जमली कीं हास्य माडीवरून घडबडत खालीं येई.पण तें रक्तबंबाळ न होता लगेच टुणकन् वर जाई ! त्या दिवशीं त्यांनीं हसण्याचा विक्रम करण्याचा बेत केला होता म्हणा ना. इकडे आबांनीं मनांत ठरवलें कीं, आतां वैद्याचें औषध घ्यायचें नाहीं. दोन पैसे जास्त गेले तरी हरकत नाहीं पण डॉक्टरचें घ्यायचें आणि मुख्य म्हणजे भाच्याला बरोबर न्यायचें नाहीं. पण कर्मधर्मसंयोगानें ही गोष्ट भाच्याचें मन न दुखवतां आपोआपच जुळली. कारण कोंकणच्या एका नातलगाच्या खटल्यांत त्याची साक्ष असल्यामुळें दुसरे दिवशींच त्यास कोंकणांत जावयाचें होतें-

दुसरे दिवशीं सकाळीं आबा बुधवार चौकांतल्या डॉ. सान्यांकडे गेले. आठच वाजले असल्यामुळें कोणी पेशंट तेथें अद्याप आला नव्हता. डॉक्टरसाहेब सिगारेट फुंकीत एकीकडे टाइम्स वाचीत होते. आबा गेल्यावर लवकरच त्यांना आंत नेऊन डॉक्टरनीं तपासलें. बाहेर आल्यावर ते आबास म्हणाले " तुमची केस Complicated आहे."

आबा—हो पन्नाशी उलटली, केस पांढरे व्हायचेच. वयच झालें आतां.

डॉ.—( मनाशीं ) स्वारी बहुतेक बहिरी दिसत्येय् ( मोठ्यानें ) तुम्हांला कॉन्स्टी ' पेशन ' आहे काय ?

आबा—छे हो, मला पेन्शन नाहीं. मला नोकरी नव्हती. खेड्यांत शेतवाडी आहे थोडी.

डॉ.—( गालांतल्या गालांत हसून ) तुम्हांला इंग्रजी येत नाहीं वाटतं ?

आबा—अक्षरांची ओळख होती मला लहानपणीं. या पुण्यांतच मी इंग्रजी पहिलीपर्यंत शिकलों आहे. पण पुढें व्यासंग सुटला—

डॉ.—( कागदावर औषध लिहून ) बरं हें तुम्हांला दोन दिवसांचं

औषध देतों तूर्त. त्यांनीं पहा काय होतें तें, उद्यां एक इंजेक्शनहि देईन. त्यानीं तुमची Pains थांबतील. दहा बारा इंजक्शनं दिलीं कीं तुम्हांला बरं वाटेल. आहेच शेजारीं अनायासं साधन. उद्यां तुमचा फोटोहि काढूं. हा कागद द्या तिथें नि एक रुपया द्या औषधाचा, नि बाटलीचा द्या एक आणा.

आबा––डॉक्टरसाहेब, आणखी वाटलें तर दोन आणे जास्त घ्या पण औषध द्या चांगलं. मला लवकरच गुण आला पाहिजे. कारण मुलीला ठिकाण पहायला मला लवकर बाहेर पडलें पाहिजे.

डा.––त्याची नको काळजी. आम्हांला जास्त पैसे नकोत. आमचें बिल बिनबोभाट दिलेत म्हणजे झालें.

आबा––( कागद कंपाउंडरजवळ देतांना ) डॉक्टरसाहेब, अगदीं स्टेशनवरील तिकीट ऑफिससारखी केली आहेत तुम्ही व्यवस्था ! पण येथें पैसे देऊन तिकीटऐवजीं बाटलीच मिळायची !

डॉ.––( हसत ) पण या बाटलीमुळें तुमचा पुढील आयुष्याचा प्रवास सुखकर होतो ना ! उलट तुमच्या शरिरांतील रोगाचा प्रवास ताबडतोब थांबतो. कारण रेल्वेंतील बिनतिकिटाच्या इसमाप्रमाणें आम्ही त्याला धक्का मारून ताबडतोब बाहेर घालवतों.

आबा––( औषध घेतल्यावर ) पथ्य काय डॉक्टरसाहेब ?

डॉक्टर––रोजचं डाएट कांहीं नाहीं. नेहमींसारखेंच जेवायचें.

आबा––बघा. नाहीं तर तो डोंगरे वैद्य ! म्हणाला तुम्हांला जलोदराची भावना आहे. तुम्ही नुसतें दुधावर रहा. पाणी अजिबात न प्यालें तर चांगलें.

डॉक्टर––काय वेड आहे काय ? वाटेवरच पडलें आहे जलोदर ! तसें कांहीं नाहीं. मात्र जडान्न, वातुळ पदार्थ कांहीं खाऊं नका.

आज आपला फोटो काढायचा आहे. म्हणून आबांना फार आनंद झाला. कारण सबंध आयुष्यांत त्यांनीं फोटो कधींच काढला नव्हता. अनायासें डॉक्टरसाहेब काढा म्हणताहेत, काढावा झालें. आहेच त्यांच्या ओळखीचा बहुतेक कांहीं घ्यायचा नाहींच. आणि त्यांतून घेतलंच तर घेईल झालें फार तर एक–दोन रुपये दुसरें काय ? सकाळीं त्यांनीं हजामत नुकतीच म्हणजे आठ दिवसापूर्वी केली होती. तरी मुद्दाम दोन आणे खर्चून पुन्हां केली.नवें धोतर नेसले,रव्याचें गंध लावले,त्यांचा कोट मळका व चुरगळलेला होता म्हणून भाच्याचा परीटघडीचा कोट घातला नि मोठ्या टेचांत ते डॉक्टरकडे गेले. डॉक्टरनीं त्यांना एक इंजेक्शन देऊन कांही वेळानें त्यांना शेजारच्या डॉक्टरकडे नेलें. डॉक्टरनीं आबांना कपडे काढावयास सांगितलें.

आबा—माझा कपडे घालूनच फोटो काढायचा आहे.

डॉ.—अहो तसा काढतां येत नाहीं.

आबा—( आश्चर्यानें ) म्हणजे ? अहो, माझ्या भाच्याचा नि त्याच्या मित्रांचा कपडे घालूनच फोटो काढला आहे कीं !

डॉ.—( हसत ) मिस्टर, तो फोटो निराळा नि हा निराळा.

डॉ. साने–डॉक्टर, हे खेडवळ आहेत, त्यांना माहिती नाहीं.

आबा—बरं बोवा तुमचा आग्रहच आहे तर काढतों कपडे. उघडा फोटो काढा, पण जरा घरांतून ताम्हन, पळी, भांडें आणायला सांगा. माझा संध्या करतांना फोटो काढा.

( दोघे डॉ. खो खो हसतात. आबा खजील होतात. )

डॉ.—काय वेडे आहां तुम्ही ? तुमच्या छातीचा नि पोटाचा फोटो घ्यायचा आहे. म्हणजे कांहीं आंत बिघडलं आहे कीं काय हें पहातां येईल.

फोटो काढतांना श्वास नीट न कोंडल्यामुळें दोन कांचा आबांनीं फुकट घालवल्या. फोटो काढल्यावर कांहीं वेळानें डॉक्टरनें फोटोचा निकाल सांगितला. आबांच्या आंतड्यांत कांहीं विकृति झाली असावी.

फुप्फुसांत दोष कांहीं नव्हता. मात्र एक दोन ठिकाणीं काळसर डाग दिसत होते. पण ते बहुधा आबांच्या नाकांतून घशाखालीं उतरलेल्या तपकिरीचे असावेत ! आबांजवळ डॉक्टरनीं फोटोंचे वीस रुपये मागितले. हें ऐकल्यावर सापाचें वेटोळें अंगावर एकदम पडल्यासारखे आबा दचकले. 'डॉक्टरसाहेब, आतां माझ्या खिशांत दोन रुपये नि कांहीं नाणें आहे' असें आबा म्हणाले. 'कांहीं घाई नाहीं; उद्यां आठवणीनें आणा नि जातांना फोटो घेऊन जा' डॉक्टर म्हणाले. घरीं आल्यावर जेवतांना आबांना कांहीं सुचेना. कारण त्यांना सारखी चुटपुट लागली होती. "हे असे पैसे उधळायला लागलों तर दिवाळं निघेल माझें. तो पुष्कळ मागेल. पण मी देईन तेव्हां ना. वाटेवरच पडले आहेत वीस रुपये. वीस रुपयांत माझा एक महिना बाहेर पडतो. वाटलं कीं पांच–सहा रुपये औषधपाण्याला जातील. जातांना 'हिला' लुगडीं नेईन व उरलेले भाच्याला मुलाबद्दल देईन, म्हणून येतांना पन्नास रुपये आणले होते. पण–सगळेच मुसळ केरांत." वगैरे नाना तऱ्हेचे विचार त्यांच्या मनांत येऊन गेले. दुसरे दिवशीं खिशांत दहाची नोट व मुद्दाम दहा रुपये सुटे घेऊन आबा गेले. डॉक्टरनी टेबलावरील पिशवींत ठेवलेले फोटो त्यांजपुढें केले नि पैसे मागितले.

आबा—डॉक्टरसाहेब, तुम्हांला फोटो काढायला दहा मिनिटसुद्धां लागलीं नाहींत नि त्याचे वीस रुपये तुम्ही मागतां तरी कसे? मी काल तुम्ही वीस म्हटल्यावर कांहीं बोललों नाहीं, म्हटलं आतांच वादंग हवा कशाला? उद्यां देतांना पाहूं. कांहीं कमी करा.

डॉ.—हें काय दुकान आहे काय दोन भाव करायला ?

आबा—असें रागावूं नका. आम्हां खेडवळांना एक भाव सांगून नाहीं पटत. अहो कुणी सांगतील तितके पैसे दिले तर मूर्खपणा पदरीं येतो ना. आपले वाडवडील सांगत आले तें खोट कां?

डॉ.—तुमचा हा खेड्यांतील नियम शहराला नाहीं लागूं.

आबा—माझं ऐका तुम्ही पांच घ्या.

डॉ.—( मनगटावरील घड्याळाकडे पहात ) मला बाहेर जायचें आहे आत्तां, काढा लवकर.

आबा—बरं तुमचं राह्यलं माझं राह्यलं सात घ्या. यंदा मुलीचं लग्न आहे.

डॉ.—( त्रासून, टेबलावरील वेटपेपर कागदावर आपटून ) काय ब्याद आहे शिंची!!

आबा—आतां अगदीं डोक्यावरून पूर म्हणजे १० रुपये.

डॉ.—( रागानें ) असा चेंगट इसम आपण जन्मांत पाहिला नव्हता. जा तुम्ही. घेतां आले तर पैसे घेईन. मी तुम्हांला ओळखून फोटो काढला नाहीं. मी डॉक्टरांजवळून पैसे वसूल करीन.

हें ऐकून आबांना काय वाटलें कोणास ठाऊक? त्यांनीं वीस रुपये त्यांच्या टेबलावर आपटले नि फोटो घेऊन पुटपुटत जिन्यांच्या पायऱ्या उतरले. तेथून ते थेट डॉक्टर सान्यांकडे औषध आणायचें होतें म्हणून गेले. कांहीं वेळानें औषध दिल्यावर डॉ. साने त्यांना म्हणाले ‘ माझी ट्रीटमेंट आहेच सुरू. पण कालच येथें मुंबईचे प्रख्यात डॉक्टर आले आहेत ते तुमच्या रोगाचे स्पेशॅलिस्ट आहेत. त्यांना तुमची केस दाखवूं. जातील फार तर दहा रुपये. काल फोटो काढले आहेत तेहि त्यांना दाखवूं. त्यांनीं एकदां डायग्नोसेस केलं म्हणजे औषध द्यायला बरं. ’

आबा कांहीं न बोलतांच हूं म्हणून तेथून निघाले. सांपडलों आहे खरा याच्या सांपडींत. आतां काय होईल तें एकेक निमूटपणें सहन

केलें पाहिजे. कोणत्या मुहूर्तावर पुण्यास यावयास निघालों कोणास ठाऊक ? या पन्नास रुपयाला पाणी लागणारच. पण त्यांवरच भागलं म्हणजे मिळविली. का भाच्याजवळ आणखी उसनवारी करायची पाळी येत आहे कोणास ठाऊक ? वगैरे वाक्यें रस्त्यांतून चालतांना ते हळुहळू पुटपुटूं लागले. घरीं गेले तों भाचा नुकताच टांग्यांतून उतरतांना त्यांना दिसला. जेवतांना त्यास दोन दिवसांतील सर्व हकीगत आबांनीं सांगितली. तेव्हां भाचा म्हणाला 'मामा, तुम्हांला माहीत नाहीं. हे डॉ. साने, एक्सूरे काढणारे डॉक्टर व ते मुंबईचे डॉक्टर हे सर्व एक-मेकांचे नातलग आहेत यांत काय तें समजा !'

---

(टीपः—या लेखांतील नांवें काल्पनिक आहेत.)

# संपादक व होतकरू लेखक

वर्तमानपत्राचा संपादक व एक तरुण गृहस्थ एका वाड्यांत राहत होते. संपादकाला पाहिलें कीं, त्याला लिहिण्याची स्फूर्ति होई. पण विद्युल्लतेप्रमाणें ती क्षणांत नाहींशीं होई ! कारण नजरभेटीनंतर सदर तरुण गृहस्थाच्या कागदाची आणि टांकाची भेट कधीच होत नसे. एक दिवस संपादकाला तो सहज म्हणाला ' अहो संपादकमहाशय, मला पुष्कळ लिहावेसें वाटतें. पण कशावर लिहावें हेंच कळत नाहीं. '

संपादक विनोदानें म्हणाले ' कशावर म्हणजे ' अर्थात् ' कागदावर ! '

तरुण—अहो, सगळें खरें. पण लिहावयास बसल्यावर शाई मात्र लेखणींत उतरते; पण मनांत विचार कांहीं केल्या उतरत नाहीं !

संपादक—अहो, त्यांत अवघड असें काय आहे ? माणसानें जरा आजुबाजूला, मागेंपुढें पाहिलें कीं, कशावर लिहावें हें आपोआप दिसतें.

तरुण—सध्यां मला या कोनाड्यांतील बाटलीशिवाय कांहीं दिसत नाहीं.

संपादक—वा ! फार उत्तम ! या बाटलीवरच पुष्कळ कल्पना सुचण्यासारख्या आहेत. पहिली गोष्ट बाटली ही कांचेची असते तेव्हां या कांचेचा शोध कोणी केला ? बाटली तयार करण्याची कल्पना कोणाला सुचली ?

तरुण—खरेंच, बाटलीनें समाजावर फार उपकार केले आहेत. बाटली नसती तर औषध कशांत द्यावयाचें याची डॉक्टरला पंचाईत पडली असती.

संपादक—मृत्यूच्या पंथाला लागलेल्या रोग्याला बरें करण्याला बाटलींतील औषध जसें कारणीभूत होतें. तसें धट्ट्याकट्ट्या माणसाला यमसदनालाहि तीच पाठविते ! रोगनिवारणाची औषधें बाटलींतच व बचनाग कोकेनसारखी जहाल विषेंही बाटलींतच. हजारो लोकांच्या संसाराची राख-

रांगोळी करणारी दारूहि ह्या बाटलींतच ! अमक्यालाच जवळ करावयाचें आणि तमक्याला दूर लोटावयाचें हा तिच्या जवळ मुळीं भेदभावच नाहीं.

तरुण—बाटली नसती तर सुवासिक तेलें कशांत ठेवावयाचीं याची पंचाईत पडली असती. बायकांच्या खोबरेल तेलापासून तों सर्व तऱ्हेच्या उंची कनोजी अत्तरांची ओळख बाटलीपासूनच होतें. एवढें असूनसुद्धां ती अतिशय प्रामाणिक ! आपण होऊन त्यांतील जिन्नस कधींहि खर्च करावयाची नाहीं. फार काय ! खर्च होईल म्हणून स्वतःची वेणीफणी करण्याच्या भानगडींतसुद्धां ती पडत नाहीं.

संपादक—असें जरी असलें तरी स्त्रिया या भावनाप्रधान ! त्यांच्या वर दाब हा कोणाचा तरी पाहिजेच ! म्हणून बुचमहाराजांची नेमणूक झाली. पण हे महाराज मोठे खाष्ट ! त्यांनीं पहिल्यांदा तिचें तोंडच बंद केलें. या बंदिवासांत तिचे कोण हाल होतात कांहीं विचारूं नका ! पण माणसाला मात्र तिची कींव येऊन तिचें तोंड मधून मधून तो मोकळें करतो. त्यावेळीं तिचे सुस्कारे ऐकूं येतात.

तरुण—पण स्त्रिया एरवी कितीहि हळूवार मनाच्या असल्या तरी प्रसंगविशेषीं त्या कठोर रूपहि धारण करतात. रागाच्या भरांत एखादे वेळीं त्या बुचालाहि गिळून टाकतात. मग विहिरींत पडलेल्या माणसाला बाहेर काढावयाला जी यातायात करावी लागते तीच यातायात याला बाहेर काढतांना करावी लागते.

संपादक—लोकोपयोगी व लोकरंजनाचें काम ती एवढें मनापासून करते. पण ती आपला जीव मात्र नेहमीं मुठींत धरून ठेवते. माणसाच्या लहरी स्वभावामुळें अथवा निष्काळजीपणामुळें तिचें मरण ओढवतें.

तरुण—म्हणूनच मला वाटतें ती मरतां मरतां माणसाला शाप देते. कारण तिच्या आवशेषावर जर कोणी पाय टाकला तर त्याचा पाय रक्तानें माखवल्याशिवाय ती रहात नाहीं.

तरुण—ही जन्माला आली तेव्हां हिचा संबंध बायकांच्या अब्रूशीं जोडला. कारण तेव्हांपासून बायकांची अब्रू म्हणजे कांचेचें भांडें ही म्हण प्रचारांत आली. या म्हणीच्या मागें स्त्रियांच्या पातिव्रत्याचा केवढा मोठा इतिहास भरला आहे तो पहा!

संपादक—एक ना दोन! कोणत्याहि गोष्टीवर विचार करूं लागलों कीं, नानातऱ्हेच्या कल्पना थैमान घालतात. मात्र त्या कल्पनांना मूर्त स्वरूप कसें द्यावयाचें हाच कायतो प्रश्न! असो. तर मग आतां ह्या बाटलीवरील संवाद तुम्ही लिहून काढा पाहूं. आम्ही तो आनंदानें आपल्या पत्रांत छापूं.

# हस्तरेषा व हास्यरेषा

आरशांत तोंड पहावें त्याप्रमाणें कोणत्याहि दैनिक वर्तमानपत्रांत माणसाचें नशीब डोकावतांना दिसतें. किती तरी लोक मोठ्या आतुरतेनें त्याकडे नित्य पाहत असतात. पण हें ओझरतें दर्शन घेऊन कोणाचें समाधान झालें आहे ?

आपल्या नशिबांत काय आहे हें जाणण्याची उत्कंठा कोणास नाहीं ? आणि वर्तमानपत्रांतील ज्योतिष्यांच्या मोठमोठ्या जाहिराती वाचून तर ही उत्कंठा वाढतच जाते. आपल्या नशिबाचा फोटो काढावा अशी फार दिवसांपासून माझी इच्छा होती. पण जन्मपत्रिका कसरीनें खाल्ल्यामुळें पत्रिका दाखविण्याचा प्रश्नच संपला होता. त्यामुळें वर्षभविष्य आणि हयातीचें भविष्य करून घेण्याचा प्रश्न माझ्या हयातीपर्यंत निकालांतच निघाला होता. एका गिऱ्हाइकास आपण कायमचे मुकलों यामुळें माझ्या माहितीचे किती तरी ज्योतिषी हळहळत होते ! उलट आपल्या नशिबांत काय आहे हें जाणण्याची मलाहि सारखी चुटपुट लागलेली होती.

उत्कट इच्छा असली म्हणजे मार्ग हटकून सांपडतोच. मलाहि याची प्रचीती आली.

कराग्रे वसते लक्ष्मीः । करमध्ये सरस्वती ॥
करमूले तु गोविंदः । प्रभाते करदर्शनं ॥ १ ॥

हा संस्कृत श्लोक सकाळीं उठल्याबरोबर डोळ्यांवर झोपेची झांपड असतांनाच लहानपणापासून तळहाताकडे पाहत मी म्हणत असे. आणि या वेळीं त्या काळोख्या खोलींत त्या तळहातावर विधात्यानें काय नक्षीकाम केलें आहे इकडे माझें लक्षहि जात नसे ! पुढें पुढें या नक्षीकामाकडे मी अहेतुकपणें पाहत असे. पण या तळहातावरील रेषांवरून आपल्या गत आयुष्यांत घडलेल्या आणि पुढील आयुष्यांत घडणाऱ्या गोष्टी कळतात हें मला पहिल्यानें कित्येक वर्षें माहीत नव्हतें.

पण योगायोगानेंच गोष्टी घडत असतास. एके दिवशीं मला सहजा-सहजीं हें रहस्य उमगलें; त्या वेळीं मी इंग्रजी सातवींत होतों. मी पुण्याहून उन्हाळयाच्या सुटींत गांवीं आलों होतों. मजबरोबर माझे एक नातलग डॉक्टरही आले होते. त्याचवेळीं आमच्या खेडेगांवीं एक हस्तसामुद्रिक जाणणारे धंदेवाईक गृहस्थहि तळ देऊन होते. रीतीप्रमाणें त्यांनीं आमच्याहि घरीं पायधूळ झाडली.

आमच्या घरांतील कांहीं मंडळींनीं त्यांस हात दाखवून नशिबाची पारख केली. त्याबरोबरच त्यांची खरी परीक्षा पाहण्यासाठीं डॉक्टरनींहि त्यास हात दाखविला. पण डाक्टर हे डॉक्टर आहेत असें लोकांना सांगावें लागत असे ! ते किती साधे होते म्हणून सांगूं ? ते डोक्याला नित्य आठ दिवसानीं कल्हई देत ! यावरून डॉक्टर हे खेडयांतील लोकांत सहज मोडण्यासारखे होते. अर्थात् त्या हस्तरेषातज्ज्ञानेंहि ते खेडयांतील असावेत असा कयास बांधला आणि त्याप्रमाणें भविष्यकथनाला सुरुवात केली.

ज्योतिषी—आपलें मराठी पांचवीपर्यंत शिक्षण झालें असावें. व्हर्नाक्युलर फायनलचा योग दिसत नाहीं.

डॉ.—हं. अगदीं बरोबर आहे. (मनांत) मी अर्थात् M. B. B., S. आहे.

ज्यो.—मातृपितृ–सुखयोग अल्प.

डॉ.—इं बरोबर ( मनांत ) आई हयात असून वय ७२ आहे. वडील मात्र वयाच्या ३२ व्या वर्षी वारले.

ज्यो.—आपलें लग्न लहानपणींच झालें असावें.

डॉ.—अगदीं बरोबर. ( मनांत ) लग्न २९ वे वर्षीं झालें. २८ वें वर्ष लागेपर्यंत मुलगीच सांगून आली नाहीं.

ज्यो.—कुटुंब नाकीडोळीं नीटस व लग्नांत अंगाबांध्यानें सडपातळ असेल. पण एकदोन मुलें झाल्यावर अंगांत मेदवृद्धि झाली असेल. कांहीं दिवसांनीं त्यांच्या अंगांत एवढा स्थूलपणा येईल कीं त्या आपणांस शोभणारहि नाहींत.

डॉ.—नाहीं तरी किती नवऱ्यांना त्यांच्या बायका शोभतात !

ज्यो.—३६ वे वर्षी शाळेचे पंच व्हाल.

डॉ.—मीं फक्त बोलण्यांत पंची आहे.

ज्यो.—वय वर्षें ४१ चे सुमारास कोर्ट–दरबारांत जमिनीबाबत भानगडी उपस्थित होतील. आणि दुसऱ्या कोर्टांत आपल्या बाजूनें निकाल लागेल.

डॉ.—पण मी अद्याप कोर्टाच्या आवारांतच गेलों नाहीं. मग पायरी कशी चढणार ? माझा धंदा काय असेल ?

ज्यो.—शेतीवाडी व सावसावकारी असली पाहिजे.

डॉ.—वा छान ! तुम्ही बरोबर जाणलंत.

ज्यो.—गांवांत एखादी धर्मार्थ सार्वजनिक विहीर बांधाल.

डॉ.—( मनांत ) मी पुण्यांत रहात असल्यामुळें तूर्त विहिरी बुजवण्याचेंच काम चालू आहे.

ज्यो.—संतती–पांच मुलगे व चार मुली.

डॉ.—( मनांत ) खानेसुमारी वाढविणें हाच खेडयांतील लोकांचा ग्रामोद्योग अशी या महाराजांची कल्पना दिसते.

ज्यो.—तुमचे वयाचे ४५ चे सुमारास तुम्ही सार्वजनिक कामांत पडाल. लोकल बोर्डांत निवडून याल. वय वर्षें ४५ ते ५८ अत्यंत ऊर्जितावस्थेचा आणि मानमान्यतेचा काळ जाईल. द्रव्यसंचय होईल. तीर्थयात्रा घडतील.

असो. ज्योतिषाच्या या अगाध ज्ञानावरून त्याची कशी संभावना झाली असेल हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. पण या वेळीं हातावरून प्रत्येक माणसाचें भविष्य कळतें हें मला प्रथमच कळलें. हस्तसामुद्रिकाची इंग्रजी आणि मराठी पुस्तकें आहेत हें मला त्या ज्योतिषाजवळच समजलें. जूनमध्यें पुण्यास आल्यावर मी एक एक पुस्तक मिळवून तें वाचूं लागलों.

व अनेक लोकांचे हातहि कुतूहलानें पाहूं लागलों. चेरो, सेंट जरमेन, बेनहॅम, रेनी, मिसेस हिल, मिसेस रॉबिन्सन् इत्यादि लेखक-लेखिकांनीं या शास्त्रावर लिहिलेले ग्रंथ ४–५ वर्षांत मीं वाचून काढले.

अगदीं पहिल्यांदा या शास्त्रावरील ग्रंथ वाचतांना मला अनेक गमती-दार अनुभव आले. या पुस्तकांत अन्तःकरण काय, धन काय, मस्तक काय सर्व 'रेषेंत' असलेलें जेव्हां पाहिलें, तेव्हां असें वाटलें कीं ज्या कोणी हें शास्त्र निर्माण केलें तो बहुधा गवंडी असावा. पण पुन्हा हाता-वरील त्रिकोण, चतुष्कोण, वर्तुळ, टिंब, फुली, तारा इत्यादि चिन्हें पाहिलीं तेव्हां तो उत्तम गणिती असावा असें वाटलें.

पुस्तकांतील सर्व उत्तम रेषा व ग्रहांचे चांगले उंचवटे (mounts) आपल्या हातावर आहेत असें पहिल्या प्रथम मला वाटलें. त्या रेषांचीं व ग्रहांचीं वर्णनें वाचून आपण कोणी तरी फार मोठे गृहस्थ होणार या सुखांतच मी कित्येक महिने गर्क होतों. पण पुढें मोठेपणाचें कोणचेंच चिन्ह माझ्या व लोकांच्या निदर्शनास न आल्यानें ही गुंगी आपो-आपच उतरली.

गेल्या पंधरा वर्षांत मी शेंकडों लोकांचे जसें कुतूहलानें हात पाहिले तसें अनेकांना हातहि दाखविले. या काळांत अनेक भलेबुरे ज्योतिषी मीं पाहिले, वादविवादांत कांहींची रेवडी उडवली, कांहींच्या अंगावरील यात्राचीं कातडीं भिरकावून दिलीं. आणि कांहींशीं तर प्रत्यक्ष जोडाजोडीच झाली. कारण हस्तसामुद्रिकाच्या पोकळ नांवाखालीं बायकांचे मऊ मऊ हात दाबणाऱ्या संभावितांची चांगलीच संभावना केली. या काळांत चार दोन पढीक पण स्वतःची बुद्धि न चालविणाऱ्या सुशिक्षित हस्तरेषातज्ज्ञांचीहि गांठ पडली. अशाच एका तज्ज्ञाला माझा हात दाखवीत असतांना, पहा-ण्याच्या ओघांत जी चर्चा झाली तिचा कांहीं भाग खालीं देत आहें.

मी—कांहो तळहाताला खळगा असला तर तो हात कनिष्ठ प्रतीचा समजतात ना ?

तज्ज्ञ—अलबत. तळहाताला खळगी असली म्हणजे पोटाची खळगी भरायची सुद्धां मारामार !

मी—अहो, पण चंद्र, शुक्र, गुरु, मंगळ, रवि यांचे उंचवटे मोठे असले म्हणजे खळगा पडणारच! पण इतका खोल विचार कोण करतो ?

तज्ज्ञ—खरं आहे, इतक्या खोलांत शिरतो कोण ?

मी—करतलाचा भाग रेशमासारखा मऊ असल्यास उत्तम व अतिकठीण असल्यास कनिष्ठ असा नियम दिला आहे. पण हा नियम सर्वत्र लागू पडत नाहीं. कारण पुष्कळ मेकॅनिकल इंजिनिअर्सचे हात अतिशय राठ असून ते श्रीमंत असलेले आढळतात. तसेंच हाताला फार रेषा असणें वाईटच नाहीं हो ?

तज्ज्ञ—केव्हांहि. रेषाळ आंब्याप्रमाणें रेषाळ हातहि वाईटच. असो. तुमच्या हातावर रविरेषा चांगली आहे, तेव्हां विद्या, यश व कीर्ति तुमच्या पाठीशीं उभी आहे. रवि–गुरूचे पर्वत मोठे असल्यामुळें आपण अतिशय महत्त्वाकांक्षी असलां पाहिजे. आपण वर्तमानपत्र काढून लोकजागृतीचें कामहि कराल. आपल्या भाषणानें लोकांवर छाप पडून आपण पुढारीहि व्हाल.

मी—अहो, पण मी अजून एकदांहि सार्वजनिक ठिकाणीं तोंड उघडलें नाहीं.

तज्ज्ञ—मोतिलाल नेहरू उतारवयांतच राजकारणांत चमकायला लागून राष्ट्रपतीहि झाले.

मी—पण ते निष्णात वकील होते. मी वकील नाहीं.

तज्ज्ञ—अहो, हल्लीं राजकारणांत पुढारी व्हायला वकिलाची मुळींच गरज लागत नाहीं. तुम्हाला जलप्रवासाचाहि योग दिसतो.

मी—म्हणजे पावसाळ्यांत रस्त्यांतून हिंडण्याचा ना?

तज्ज्ञ—छे हो! मी थट्टा करीत नाहीं. तुमच्या चंद्रावर प्रवासरेषा एक सोडून दोन आहेत. यावरून आयुष्यांत एकदां तरी तुम्हांला जल-प्रवास निश्चित होईल असें वाटतें.

मी—अहो, पण पुष्कळ लोकांच्या हातावर ही रेषा मीं पाहिली आहे पण केस पिकले तरी त्यांना कांहीं जलप्रवास घडला नाहीं. उलट प्रतिकूल परिस्थितीमुळें अश्रूंचा प्रवास मात्र बाराहि महिने सुरू असतो. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, विलायतच्या वाऱ्या करून आलेल्या लोकांचे हात पाहिले असतांना त्याच्यापैकीं कांहींच्या हातावर या रेषेचा मागमूस देखील दिसत नाहीं.

तज्ज्ञ—पण शास्त्र असें सांगतें.

मी—पण अनुभव असा बोलतो.

तज्ज्ञ—तुम्हाला वाहनसुख नेहमीं मिळेल.

मी—म्हणजे मोटारहाक्या होणार कीं काय ?

तज्ज्ञ—छे हो! तुम्हाला धनयोग बलवत्तर आहे. तुमच्या मंगळाचे पर्वतावर जें अन्तरमुख शंखचिन्ह आहे तें फार उत्तम आहे; त्यानें अचानक धनप्राप्ति होईल.

मी—तुम्ही तर साखर पेरायला लागलात. हल्लीं कोणत्याहि सुशिक्षित तरुणाला तीन गोष्टी सांगितल्या कीं तो अगदीं हुरळून जातो. एक जल-प्रवास, दोन अचानक धनलाभ, तीन प्रेमविवाह. पैकीं दोन तर तुम्हीं मला सांगितल्यात, आता तिसरी सांगा.

तज्ज्ञ—करंगळीच्या खालीं बाहेरील भागांतून आंत ज्या आडव्या एक, दोन, तीन रेषा बुधाच्या पर्वतावर आलेल्या असतात, त्याच स्त्री संबंधीं रेषा समजाव्या. ह्या रेषा आंखूड व बारीक असल्यास त्यावरून प्रेमाच्या स्त्रिया त्या पुरुषास मिळतील असें समजावें. तुमच्या हातावर हा योग दिसत नाहीं. तुम्हाला द्विभार्या—योग मात्र स्पष्ट दिसतो.

मी---जरा हळूं बोला. घरांत ऐकू गेलं तर नसती पंचाईत.

तज्ज्ञ---हो खरंच कीं, भविष्य सांगतांना आजूबाजूला पहायला लागतं तें एवढयाचसाठीं.

मी---होणं जाणं आपल्या हातांत थोडंच आहे! पण विषयच निघाला आहे म्हणून विचारतों कीं, पहिली बायको मृत झाल्यावर किती वर्षांनीं विवाह होईल?

तज्ज्ञ---मध्यें मुळींच विलंब लागणार नाहीं. वर्ष-सहा महिन्याच्या आंत सहज होईल.

मी---हें तुम्ही शास्त्राविरुद्ध बोलतां. तुमच्या शास्त्राप्रमाणें विचार केला तर मध्यें कमींतकमीं पंधरा वर्षांचा काल विरहावस्थेंत काढावा लागणार! कारण अन्तःकरणरेषा आणि कनिष्ठिकेचें मूळ या दोहोंतील अंतर, हें ७५ वर्षांचे समजून त्याचे पांच भाग करावेंत. हें वयोमान अंतःकरणरेषेकडून मोजायचें व ज्या वयोमानांत ही रेषा स्पष्ट नजरेस येईल, त्या वयोमर्यादेत असणारे वर्ष हेंच लग्नवर्ष समजावें, असें सामुद्रिक शास्त्र सांगतें. तेव्हां माझ्या हातावरील दोन विवाहरेषेंतील अंतर कमीत कमी पंधरा वर्षें तरी निघतें. अर्थात् विवाहाचा काल काढण्याच्या बाबतींत तरी या रेषा निरुपयोगी ठरतात, हें उघड आहे

तज्ज्ञ---तुमचं म्हणणं पटलं मला.

मी---बरं हातावर एक विवाहरेषा असूनसुद्धां दोन विवाह होतात. उलट दोन रेषा असून सुद्धां एकच विवाह होतो. आणि सगळ्यांत आश्चर्य म्हणजे हातावर दोन रेषा असूनसुद्धां विवाह न झालेले लोक दृष्टीस पडतात. बरें याच रेषांवरून स्त्रीला पति कसा मिळेल याचा विचार करतात. मग ज्या स्त्रीच्या हातावर दोन किंवा तीन रेषा बुधाच्या पर्वतावर आलेल्या स्पष्ट दिसतात, त्या स्त्रीला तेवढे नवरे होणार असें समजावयाचें कीं काय? कारण पुरुषांप्रमाणेंच पुष्कळ स्त्रियांच्याहि हातावर अशा दोन-तीन रेषा

आढळतात. पण अनुभव तसा येत नाहीं हें सूर्यप्रकाशाइतकें सत्य आहे.

तज्ज्ञ—तुम्ही बराच विचार केलेला दिसतोय् या शास्त्रासंबंधीं !

मी—बरें, या रेषांचीं मुखें अधोगत होऊन अंतःकरणरेषेला स्पर्श करीत असतील तर तितक्या स्त्रिया मृत झालेल्या असतात हा नियमहि सापवाद आहे. आतां ही अंत:करणरेषा पहा. हिला पौर्वात्य शास्त्रज्ञ आयुष्यरेषा म्हणतात व पाश्चिमात्य शास्त्रज्ञ अंतःकरणरेषा म्हणतात. पण तुम्ही चार-पांचशें हात पाहिलेत तर त्यांतील दोन-तीन हात तरी ही रेषा नसणारे सांपडतील.

तज्ज्ञ—खरं आहे. मींसुद्धां ही रेषा नसणारे हात पाहिले आहेत. पण हीं माणसें चांगलीं पन्नाशीं उलटलेलीं असतात.

मी—मग आयुष्यरेषेशिवाय हे आयुष्य कसें कंठितात ? यावरून हिला आयुष्यरेषा मानतां येत नाहीं हें उघड आहे.

तज्ज्ञ—तुमचें म्हणणें खरें आहे.

मी—बरं, पाश्चात्य शास्त्रज्ञ हिला ‘ अन्तःकरणरेषा ’ म्हणतात. म्हणजे या लोकांना अन्त:करण नसतें कीं काय ? द्या उत्तर!

तज्ज्ञ—मति कुंठित होते बुवा तुमच्या प्रश्नापुढें.

मी—तीच गोष्ट हातावरील धनरेषांची. मनुष्याला किती द्रव्य मिळेल, कोणत्या साधनांनीं मिळेल, कोणत्या धंद्यात मनुष्य उदयाला येईल इत्यादि गोष्टींचा निर्णय या धनरेषेवरून होतो. ही धनरेषा चार ठिकाणीं उदय पावते. एक चंद्राच्या पर्वतावरून, दुसरी मनगटाचें मध्यावरून, तिसरी आयुष्यरेषेंतून व चौथी करतलाचे मध्यभागांतून उगम पावते.

तज्ज्ञ—श्रीमान्, विद्वान्, बुद्धिमान्, जमिनदार व सुखी अशा मनुष्याच्या हातावर धनरेषा उत्कृष्ट उमटलेली असते आणि अनुभवहि तसाच येतो.

पण याच्या उलटहि अनुभव दृष्टीस पडतो. एखाद्या हातावर चंद्राच्या पर्वतावर उगम पावून शनीच्या पर्वताकडे गेलेली धनरेषा असते. एवढेंच नव्हे तर आयुष्यरेषेंतूनहि धनरेषा उगम पावलेली असते. शास्त्राप्रमाणें कोणीहि सांगेल, कीं हा मनुष्य श्रीमंत आणि सुखी असला पाहिजे. पण त्यास दुपारची भ्रांत असते! रोज आठ तास कष्ट केले तरी पदरी रुपया बारा आणे मिळायची मारामार! आणि कुटुंबांत माणसें मात्र सात आठ. बरं हातावर धनरेषा नसली, तर मनुष्य दरिद्री असतो. काबाडकष्ट करून उदरनिर्वाह करणाऱ्यांच्या हातावर व शेतकऱ्यांच्या हातावर ही रेषा नसते असें शास्त्र सांगतें. आतां हाच हात पहा (त्यास एका हाताचा कागदावरील ठसा ( प्रिन्ट ) दाखविला. )

या हातावर अगदीं मोजक्या रेषा आहेत. आयुष्य, अन्तःकरण व मस्तकरेषा. बुधाच्या पर्वताखालीं आडवी एक रेषा व शुक्राच्या पर्वतावर एक आडवी टळक रेषा आहे. हात चतुष्कोणाकृति ( square hand ) आहे. काय सांगाल तुम्ही हा हात पाहून?

तज्ज्ञ—काय सांगायचें? अहो, याला कांहीं फारसें डोकें खर्च करायला नको! अगदींच कनिष्ठ प्रतीचा हा हात!

मी—पण या माणसास हल्लीं २०० रुपये पगार आहे व ५०० रु. पर्यंत वाढ व्हावयाची आहे. बोला, आतां होईल का कल्पना?

तज्ज्ञ—नाहीं व्हायची बोवा!

मी—बरें, यानें नोकरींअगोदर किती धंदे केले, सांगतां येईल? बघा प्रयत्न करून.

तज्ज्ञ—अंदाजानेंच सांगायचें तर एखाद–दुसरा केला असेल. तसं खरं पाहिलं तर कांहीं उमगणार नाहीं.

मी—अहो, छप्पन्न धंदे केले या माणसानें. खेळायचे पत्ते तयार केले, अडकित्यांचा कारखाना काढला, छापखाना काढला, संस्थानिकांना लग्न-

प्रसंगीं भाड्याच्या मोटारी पुरविल्या, गोवा लॉटरीचीं तिकिटें विकलीं, रंगूनला २ वर्षे मॅच फॅक्टरींत रोज १० तास काम केलें. पण पुढें त्या फॅक्टरीलाच आग लागली व तेथून हात हलवीत परत यावें लागलें आणि नंतर ही नोकरी लागली आणि हे सर्व धंदे २८ वर्षांच्या आंत झाले. होईल का या गोष्टींचा बोध ?

तज्ञ—नाहीं व्हायचा. मग शास्त्र खोटेंच म्हणायचें कीं काय ?

मी—अहो, शास्त्र खरं आहे. सूक्ष्म दृष्टि असली तर आपोआप सर्व गोष्टींचा उलगडा होतो. अहो, त्या गृहस्थाचे मंगळ, शुक्र, चंद्र, आणि बुध यांचे पर्वत उठावदार आहेत व त्यांचांच परिणाम त्याच्या आयुष्यावर झाला आहे; आणि हीच महत्वाची गोष्ट आहे.

तज्ञ—म्हणजे नुसती धनरेषा पाहून व्यक्तीच्या भाग्योदयाचा विचार केला तर तो ज्योतिषी तोंडघशींच पडेल.

मी—अलबत ! धनरेषेचा विचार करतांना त्यानें हातांतील ग्रहांच्या पर्वतांचाहि अवश्य विचार केला पाहिजे. नाहीं तर त्याच्या शब्दाला तंबाखूच्या रसाची किंमत येईल ! तीच गोष्ट कालनिर्णयाची ! आयुष्यांत घडणाऱ्या गोष्टींचा निर्णय अमुक एका पद्धतीनें अचूक बरोबर येतो, असें कोणासहि छातीठोकपणें सांगतां यावयाचें नाहीं.

तज्ञ—कालनिर्णयाच्या बाबतींत मोठी तारांबळ उडते हें कांहीं खोटें नाहीं.

मी—आतां धनरेषेचींच गोष्ट घ्या. समजा, एखाद्याची धनरेषा चंद्राचे पर्वतावर उगम पावून शनीचे पर्वतावर गेलेली आहे. ही धनरेषा १०० वर्षांची मानून तिचे पांच–पांच वर्षांचे वीस भाग करावे असें शास्त्रकार सांगतात. अगोदर मुळांत ही रेषा १०० वर्षें कां धरावी हाच मुळीं प्रश्न.

तज्ञ—कारण हल्लीं १०० वर्षें जगतो आहे कोण ?

मी—वरील हिशेबानें धनरेषेचा विचार करतां तो मनुष्य साधारण

पंधरा वर्षांचे आंतच द्रव्यार्जन करणारा असला पाहिजे. पण अनुभव अगदीं उलट असतो- पंचविशी उलटली तरी मुलगा बापावर अगर पालकावर अवलंबून असतो.

तज्ज्ञ—अगदीं खरें आहे. माझे दोन मुलगे पंचविशी उलटली तरी घरीं स्वस्थ झोपा काढीत आहेत. नोकऱ्या आहेत कुठें ?

मी—आतां हा हात पहा (असें म्हणून मी त्यास कोंकणच्या एका कातकऱ्याच्या हाताचा ठसा दाखविला. आणि हा. हात कोणाचा याची त्यांस दाखलगिरी दिली नाहीं.)

तज्ज्ञ—(हाताकडे निरखून पाहून) वा! हात कोणा तरी मोठया माणसाचा दिसतो आहे!

मी—अगदीं बरोबर ओळखलेत!

तज्ज्ञ—Square Hand आहे त्यामुळें माझ्या म्हणण्याला जास्त बळकटी येते.

मी—रेषा स्पष्ट व छान आहेत.

तज्ज्ञ—धनरेषाहि चांगली आहे.

मी—धनरेषेवर तळहाताच्या मध्यभागीं त्रिकोणहि चांगला झाला आहे.

तज्ज्ञ—आयुष्यरेषेंतून धनरेषा निघत असल्यामुळें स्थावर इस्टेटहि असली पाहिजे.

मी—आहे थोडीशी.

तज्ज्ञ—सूर्याच्या पर्वतावर दोन उभ्या रेषा आहेत. तेव्हां हा मनुष्य विद्वान्, रसिक आणि श्रीमंतहि असला पाहिजे.

मी—आहे.

तज्ज्ञ—मस्तकरेषा ज्या अर्थी चंद्राचे पर्वतावर गेलेली आहे त्याअर्थी या मनुष्याचे हातून काव्यनिर्मिति होण्याचाहि संभव आहे.

मी—( हसून ) अहो, दिवसभर उन्हातान्हांत काबाडकष्ट करून मोळी विकून रोज दोन आणे मिळविणाऱ्या एका कोंकणांतील कातकऱ्याचा हा हात आहे. तुम्ही खजील व्हायचें मुळींच कारण नाहीं. कारण माणसाची परिस्थिति कळल्याशिवाय भविष्यकथन करणें अगदीं चूक आहे, असें माझें स्पष्ट मत आहे. खेडयांतील खालच्या वर्गांतील लोकांचे हात पाहिले तर कितीतरी चांगले चांगले योग त्यांचे हातावर दिसून येतात, पण प्रतिकूल परिस्थितीमुळें दारिद्र्याच्या मगरमिठींतून त्यांची सुटकाच ह्यातभर हीत नाहीं !

---

# पहा हो ही !

या शिकलेल्या स्त्रिया अश्या अश्या पुरुषांच्या डोक्यावर बसणार! उघडच आहे; आहेच तशी त्यांची योग्यता. बरं आतां शिकल्यासवरल्या म्हणून साधे लेणें लेतील? नांव नको! नटायला, थटायला, मुरडायला यांना हवं! शालु नेसतात, ते सुद्धां किती तऱ्हेतऱ्हेचें? कधीं केशरी, कधीं गुलाबी, कधीं डाळिंबी तर कधीं किरमिजी! आमची ' ही ' सुद्धां अगदीं अशीच!! हिचं नाकसुद्धां कसं अगदीं पोपटासारखें हो. आणि त्या नाकांत चमकी किती छान शोभते! जिथचा अवयव तिथं असला म्हणजे अस्स सौंदर्य चढतं, अस्स तेज खुलतं! घर पहावं तर किती विलासी! महालांतील लोड, गालीचा कसा जरतारीनं मढविलेला. आम्ही विचारतों कीं, एवढ्या विलासी कां? तर म्हणे आम्ही विलासी असल्या-शिवाय इकडली स्वारीच मुळीं विलासी रहात नाहीं; आमचें सौंदर्य पाहून डोळ्यांचं पारण यांनीं फेडावं. नवीन फॅशन आम्ही पाडावी, आणि तिचं अनुकरण या पुरुषांनीं करावं! आम्ही यांच्या डोक्यावर असलों म्हणजेच यांची बुद्धि तरतरीत रहाते; वकिलीणबाई पक्षकाराला कसं फसवावं याचा कानमंत्र देते. या बोटावरची थुंकी त्या बोटावर कशी करावी, याचा धडा व्यापारीणबाई ' इकडे ' देत असते; बुद्धि-मत्तेच्यें चाटण मुत्सद्याची बायको ' तिकडे ' देत असते. कायद्याच्या चौकटींत चौकसपणें कसं बोलावं याचा धडा न्यायाधिशीणबाई आपल्या यजमानांना देत असते; समयोचितपणाच्या आदर्शांत कसं पहावं हे कीर्तनकारीण आपल्या यजमानांना शिकवित असते. पहा हो, ही दुसऱ्यांवर पगडा बसविणारी कोण ती! कोण म्हणजे? अहो ती आपली पगडी!

———

# बोलक्या बाटल्या

[ स्थळः—पुण्यांतील एका डॉक्टरचा दवाखाना. सकाळीं १०॥ ची वेळ. आषाढ महिना असल्यामुळें रोग्यांनीं दवाखाना गच्च भरला आहे. डॉक्टर मोठ्या खुषींत गळ्यांत स्टेथॉस्कोप अडकवून फिरत्या खुर्चीवर बसले आहेत. ते रोग्यांच्या केसेस काढून एकेक रोग्याला बोलावून प्रकृतीची विचारपूस करून औषधांत कांहीं फेरफार करण्यासाठीं कागदावर लिहित आहेत. रोगी कागद व बाटली घेऊन कंपाउंडरजवळ देत आहे. बाहेर जशी रोग्यांची गर्दी तशी कम्पाऊंडरच्या खोलींत बाटल्यांची गर्दीच गर्दी उडाली आहे. औषधांच्या बाटल्या रांगेनें सैन्यांतील शिपायांप्रमाणें शिस्तींत उभ्या आहेत. तर रोग्यांच्या बाटल्यांपैकीं कांहीं उभ्या आहेत तर थकल्यामुळें कांहींनीं अडवें अंग केलें आहे. चार बायका एके ठिकाणीं बसल्यावर त्या बोलल्या नाहींत असें कधीं तरी झालें आहे का? या बायकांनीं सारखी लुबलुब चालविली आहे. त्यांच्याकडे जरा कान द्या. बघा तुमची करमणूक झाली तर. ]

‘ बाई तुम्ही कुठल्या ? ’ पहिली बाटली म्हणाली.

‘ मी गोखल्यांकडली. ’ दुसरीनें उत्तर दिलें.

‘ राहतां कोठें ? ’

‘ सदाशिव पेठेंत. ’

‘ कोण आजारी आहे ? ’

‘ अहो, आमच्या मालकीणबाईच आजारी आहेत. ’

‘ काय होत आहे त्यांना ? ’

‘ त्यांचं त्यांनाच ठाऊक ! आज तीन महिन्यांत चार डॉक्टर झाले. ढमढेरे झाले, लागू झाले, रणदिवे झाले. आतां या रानड्यांचें औषध सुरूं आहे. ’

'पण गूण नाहींना अजून ?'

'अहो गूण येईल कसा ?'

'कां ? कुपथ्य का करतात ?'

'अहो कुपथ्य कसलं ? डॉक्टरनीं दिलेलं औषध जर रोज मोरींत ओतलं तर गूण काय येईल डोंबलं !'

'बाई आश्चर्य आहे.'

'पण हा रानडे बरा भेटला आहे स्वमंग.'

'हळूं बोला जरा. बायकांच्या खोलींत गेले आहेत डॉक्टर.'

'बरं बोललांत. मला नाहीं रहात सुमार. या डॉक्टरनीं बरी काढली आहे युक्ती.'

'ती काय ?'

'अहो, हे औषधहि देतात नि एक दिवसाआड इंजक्शनहि करतात !'

'लकडीशिवाय मकडी वळत नाहीं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं !'

'बरं, तुमच्याकडे कोण आजारी आहे ?'

'आमचे सदाशिवराव भावे.'

'म्हणजे ते तांदुळाचे व्यापारी हो ?'

'हो, आज दोन महिने आजारी आहेत.'

'काय होत आहे त्यांना ?'

'त्यांना झाला आहे मधुमेह.'

'म्हणजे, गोड फार खात असत कीं काय ?'

'तें कांहीं विचारूं नका. रोज चहा प्यायचा किती कांहीं सुमार ! अहो, पांच सहा कप चहा होतो रोज. शिवाय लाडू चिवडा—'

'पण गोड खाण्यांनीं मधुमेह होतो असं कुठं आहे ? नाहीं तर सगळ्याच भिक्षुकांना मधुमेह झाला असता !'

'हो, तें खरंच आहे. पण मधुमेह झाल्यावर बरीक गोड खाणं सोडावं लागतं. भाव्यांनींसुद्धां आतां गोड खाणं सोडलं असेल ?'

'अहो, गोड खाणंच काय पण गोड बोलणंसुद्धां त्यांनीं सोडलं आहे !'

'त्रासतं हो मनुष्य.'

'त्रासतं ! अहो या दुखण्यापासून निम्मा नाहीं राहिला पुरुष ! पथ्य आहे ना कडक !'

'हो भात मुळींच खायचा नसेल ?'

'अहो भातावर तर यांचा पिंड पोसलेला. भात म्हणजे त्यांना जीव कीं प्राण. आतां तर नुसत्या सातूवरच राहातात.'

'हं. वर्षातून एकदां श्रावणींत सातूच्या पिठाच्या दोन–तीन गोळ्या खायच्या.'

'त्याच्या आतां रोज पोळ्या खायची वेळ आली ! बाकी मोठमोठ्या माणसांनाच होतो मधुमेह.'

'तर ! अहो टिळकांनासुद्धां झाला होता मधुमेह ! साध्यासुध्या माणसाला होत नाहीं.

'तुम्हीं भाव्यांकडे राहातां होय ? मला नव्हतं माहीत. मी तुमच्याच बोळांत राहते' ३ री म्हणाली.

'अस्सं, कुठें ?'

'बोबडे वकिलांकडे.'

'हं आहे खरी पाटी. पण तुम्ही जवळच्या चोमडे डॉक्टरकडे कां नाहीं जात ?'

'कसला तो डॉक्टर ! कशी परिक्षा पास झाला कुणास ठाऊक ?'

'अहो, पहिल्यांदा त्याचंच औषध होतं बोबड्यांच्या मुलाला. पण होतं त्यापेक्षां दुखणं वाढवलन मात्र जास्त.'

'त्याला परिक्षा बेताचीच आहे.'

'पण बडबड किती त्याची. माझी यंव प्रॅक्टीस आहे नि त्यंव प्रॅक्टिस आहे.'

' पण दवाखान्यांत कंम्पाउंडरसुद्धां ठेवायची ताकद नाहीं. '

' अहो, दिवसांतून दोनतीन बाटल्या जात असतील कां नाहीं याची शंका आहे ! '

' पण आमचा बन्या म्हणतो कीं याच्या दवाखान्यांत केव्हांहि गेलं कीं आपल्या व्हिजिटच्या नि इंजक्शनाच्या गोष्टी सारख्या बोलत असतो. '

' म्हणजे काय ? '

' तो म्हणतो मी व्हिजिट, इंजक्शनवरच पैसे मिळवितो. माझे बहुतेक रोगी क्षयाचे आहेत. '

' मग नशिबवान दिसतो. '

' ऐका तर खरं. आमचा बन्या गेला त्याच्या दवाखान्यांत नेहमीं-प्रमाणें गप्पा मारायला. तेव्हां हा म्हणाला, ' जरा बसा; मला व्हिजिटला जायचें आहे. दहा मिनिटांत आलों. ' असं म्हणून बॅग घेऊन सायकलवर बसूनसुद्धां एकदां तो गेला. इतक्यांत बन्याला काय वाटलं कुणास ठाऊक ? जरा, वेळानं बन्याहि त्याच्यामागून सायकलवर गेला. '

' वा, छान ! '

' अहो सांगायची गंमत म्हणजे डॉक्टरनें लकडीपुलापर्यंत एक चक्कर मारली. मग गायकवाडवाड्यावरून बुधवारांत जाऊन स्वारी दवाखान्यांत आली ! '

' हं चांगलीच व्हिजिट आहे ही. '

' बन्या मात्र तिच्या अगोदरच मधल्या रस्त्यानं दवाखान्यांत आला ! '

' बाई काय तरी ! '

' त्याच्यां मागून लगेच डाक्टर आला नि लगेच हाताला साबण लावून एकीकडे बोटांना फेस चोळींत म्हणाला, ' आतांच एका टी. बी. पेशन्टला गोल्डचं इंजक्शन दिलें म्हणून स्वच्छ हात धुतों. हो, नसती पीडा व्हायची नाहींतर ' बन्या मात्र खो खो हसूं लागला. '

( सर्व बाटल्याहि खो खो हसूं लागल्या. )

‘ पण या डॉक्टरांचं नाहीं हो तसं. ’

‘ अहो यांची गोष्ट कोणीकडे ? यांना बोलायलासुद्धां फुरसद नाहीं. ’

‘ दोन कंम्पाउंडर आहेत तरी फे फे उडते त्यांची औषध देतांना ’ पहिली म्हणाली.

‘ आणि हाताला यशहि आहे त्यांच्या ’ चवथी म्हणाली.

‘ उगीच कां लांबलांबून लोक येतात यांच्याकडे ’ ५ वीनें पुष्टी दिली.

‘ इतकं असून बोलणं किती गोड ’ ६ वी नें उत्तर दिलें.

‘ यांच्या नुसत्या बोलण्यानींच रोग्याला निम्मा धीर येतो ! ’ चवथीनें भाष्य केलें.

‘ आणि यांची पैसा उकळण्याची वृत्ति नाहीं. गुण आल्यावर एक दिवस जास्त औषध देत नाहींत. लगेच एखादं टॉनिक लिहून देतात. ८ वी म्हणाली.

‘ सगळं खरं, पण बोबड्यांच्या मुलाला काय होत आहे ? ’ २ रीनें प्रश्न केला.

‘ आज सोळा दिवस झाले. मुलाचं वर कानशील नाहीं. हातरुणावर पडून आहे. ’ अंगांत रोज दोन ताप. टायफाईड झाला आहे त्याला ! ’

‘ बाई, मोठंच दुखणं आहे. ’

‘ पण व्यवस्था किती आहे त्याची. औषध देण्यांतसुद्धां बोबडे वकील किती वक्तशीर आहेत म्हणून सांगूं ? नऊ वाजून तीस मिनिटांनीं डोस असला तर तो त्याचवेळीं मुलाच्या तोंडांत जातो !

‘ असंच पाहिजे ! ’

‘ आतां कालचीच गोष्ट घ्याना. डॉक्टरनीं १० वाजतां द्यायला झोंपेची पुडी दिली होती त्यावेळीं मुलाला झोंप लागली होती. पण मुद्दाम उठवून मुलाला बरोबर दहा वाजतां झोंपेची पुडी दिली ! ’

‘ याच्या अगदीं उलट आमच्या घरची स्थिती आहे.’ पांचवी म्हणली.

‘ ती काय ?’

‘ अहो, डॉक्टरनं औषध दिलं कीं दिवसांतून जेमतेम दोन डोस पोटांत जायची मारामारं !’

‘ कारण आमच्या बाईसाहेब आहेत झोपाळू. औषध घ्यायची वेळ आली कीं त्या मुद्दाम झोपेंचं सोंग घेतात ! नि मग तसंच औषध रहातं.’

‘ कडू असेल औषध ?’

‘ कडु न बिडु करायला लहान का या. तिशी उलटल्येय त्यांची. चांगली सहा मुलांची आहे आई.’

‘ मगहो काय ?’

‘ भोग आहे त्या नवऱ्याचा ! एरव्ही डॉक्टरचीं घरं कशी भरतील !’

‘ अहो त्याचं उत्तर मी देतें’ ६ वी म्हणाली.

‘ द्या पाहूं ?’

‘ अहो तुमच्या बाई आजारी तरी आहेत पण आमच्याकडे कोणी आजारी नसून औषध मात्र सुरू आहे.’

‘ श्रीमंती दुखणं दिसतयं ! तुम्हीं कुणाकडल्या ?’

‘ आम्हीं कलेक्टरांकडल्या !’

‘ अस्सं. मग बरोबर आहे. या लहान बाटल्या कोणाकरतां ?’

‘ अहो काल त्यांच्या तीन वर्षांच्या मुलीला आल्या दोन तीन शिंका !’

‘ मग पडसं आलं म्हणून औषध कीं काय ?’

‘ ऐका जरा. बाईसाहेबांना वाटलं मुलीला आलं पडसं, पण खरं सांगायंच म्हणजे मुलीला सांभाळणाऱ्या गड्यानं लावली होतीऱ् तिच्या नाकाला तपकीर !’

‘ त्यांनीं आल्या असतील शिंका. अहो डॉक्टरनासुद्धां औषध द्यायची पंचाईत पडायची ! ही दुसरी लहान बाटली कुणाकरतां ?’

'ही धाकट्या साहेबांकरतां. काल त्यांना दोन तीन जांभया आल्या.'

'म्हणून औषध हो !'

'होना. बाईसाहेबांना वाटलं कीं यांना हिंवाची पाळी येईल. पण खरं सांगायचं म्हणजे छोट्या साहेबांची दुपारी झोंप झाली होती चांगली तीन तास.'

'मग उठल्यावर त्यांना जांभया आल्या असतील !'

'बरं, तुम्ही कोणाचं औषध न्यायला आला ?'

'मी खुद्द कलेक्टरीण बाईकरतां.'

'त्यांची काय हकीकत आहे ?'

'त्यांना कांहीं होत नाहीं, पण त्यांना कांहीं होऊं नये म्हणून त्याच्या-करतां त्यांना औषध !'

'चंगळ आहे झालं डॉक्टरची.'

'हो तर काय ? अहो दोन हजार रुपये पगाराला कांहीं खर्च हवा ना.'

'आमची हकीकत ऐकण्यांत सध्यां तुम्हांला मजा वाटेल,' ९ वी म्हणाली.

'हो वाटेल खरंच' १० वीनें अनुमोदन दिले.

'सांगा बाई लवकर. आतां उशीर झाला जायला' पहिली म्हणाली.

'आम्ही एका जोडप्याकरितां औषध न्यायला आलो आहों. तसं पाहिलं तर दोघांची प्रकृति चांगली खुडखुडीत आहे.'

'मग ?'

'पण बायको आहे लठ्ठ नि नवरा आहे काटकुळा.'

'वजन काय त्यांच ?'

'अहो लोकांत नवऱ्याचं अगदीं गांधींसारखं वजन आहे.'

'पुढारी आहे वाटतं ?'

' होना. पण त्यांचं वजन आहे ८० नि बायकोचं आहे १५५ पौंड !

' हुश्श ! ! '

' तेव्हां एकाचं औषध आहे वजन वाढण्यासाठीं नि एकीचं आहे घटण्यासाठीं ! '

' छान ! '

' मला वाटतं या दोघांच्या औषधाची रोज चुकून अदलाबदल झाली तर गंमत होईल नाहीं ? '

' खरंच कीं, कम्पाऊंडरला सांगा तुमची युक्ति. '

' चांगली आहे तुमची युक्ति ! तुमच्या नादाला लागून माझ्या पोटावर बरीक पाय यायचा ! उठा आतां ज्यांची औषधं दिलीं आहेत त्यांनीं, गर्दी कमी करा, मला आतां विडी प्यायची आहे. ' कम्पाऊंडर म्हणाला.

' नाहीं तरी तूं कुठं आमच्या तोंडावर धूर सोडीत नाहींस ? ' जातां जातानां हसत कांहीं म्हणाल्या.

---

# आमचीं प्रकाशनें.

*** हिंदुस्थानचा संपूर्ण इतिहासः**–ले. ग. ना. जोशी, बी. ए. एल्. टी
मराठी भाषेंत या प्रकारचें या विषयावरचें हें पहिलेंच पुस्तक असून याच्या तोडीचें मराठींत दुसरें पुस्तक नाहीं. महाराष्ट्रांतील नामांकित शाळांतून हेंच पुस्तक चालू आहे. कि. रु. २॥. पृ. सं. ५८०.

*** हिंदुस्थानचा सुलभ इतिहासः**–ले. ग. ना. जोशी, बी. ए. एल्. टी.
शिक्षणशास्त्राला अनुसरून अत्यंत पद्धतशीर रीतीनें लिहिलेला हा इतिहास ठिकठिकाणीं चालू असून याची सुधारून वाढविलेली ४ थी आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. कि. १४ आणे.

*** इंग्लंडचा सुलभ इतिहासः**—ले. ग. ना. जोशी, बी. ए. एल् टी.
इतर पुस्तकांतील विवेचनापेक्षां या पुस्तकांतील विवेचनपद्धति फार भिन्न असून मांडणीहि शिक्षणशास्त्राला धरून आहे. कि. १॥ रु.

**रेषमाचे कोषः**—ले. विद्यासेवक, बी. ए.
जगांतील भिन्न भिन्न देशांतील नवलपूर्ण कथांचा हा अभिनव संग्रह फारच उत्कृष्ट असून महाराष्ट्रांतील सर्व पत्रांनीं व मासिकांनीं याचें मुक्तकंठानें स्वागत केलें आहे. मध्यप्रान्ताच्या शाळाखात्यानें हें पुस्तक लायब्ररी-बुक म्हणून मंजूर केलें आहे. कि. अवघी ८ आणे.

**विज्ञान (Physics)**:–ले. के. वि. चितळे; बी. एस्सी; बी. ए. एल्एल्. बी.
यांनीं हें पुस्तक लिहिलें असून मध्यप्रान्त हायस्कूलबोर्डानें या पुस्तकाची हस्तलिखित प्रत मंजूर केली असून छापील प्रतीहि मंजुरीसाठीं गेल्या असून लौकरच मंजुरी मिळेल. नित्याच्या व्यवहारांत विज्ञानाचा उपयोग कसा केलेला असतो हें सोदाहरण यांत दाखविलें आहे. मराठी भाषेंत या विषयावर इतकें उत्कृष्ट दुसरें पुस्तक नाहीं. कि. २॥ रु.

**त्यागपत्रः**–ले. जैनेन्द्रकुमार, रूपान्तरकार–प्रो. ए. एम्. जोशी.
मराठी भाषेंत नवी अभिनव कादंबरी. कि. १॥ रु.

**लॅबॉरेटरी मॅन्युअल्सः**—प्रयोगशाळेंत होणाऱ्या प्रयोगांचीं टिपणें पद्धतशीर करतां येऊन त्यांचा उत्कृष्ट उपयोग व्हावा या उद्देशानें लिहिलीं असून पुष्कळ शाळांनीं हीं पसंत केलीं आहेत.

**मासलेवाईक चेहरेः**—ले. मो. गो. सोमण, बी. ए.
हास्यरस उत्पन्न करणाऱ्या विनोदी लेखांचा संग्रह. कि. १। रु.